# म्हातारपणचे डोहाळे

लेखक

गणेश दिनकर आठवले
बी. ए. एल्. टी.
भंडारा (सी. पी.)

प्रकाशक
रामकृष्ण बुक डेपो
गिरगांव, मुंबई नं. ४

# शुभेच्छा

" म्हातारपणचे डोहाळे " या नाटकांत वसंतरावांनीं नाटकाचे समाप्तीचे वेळीं सर्वांस दिलेला आशिर्वाद हेंच नाटककाराचें हृद्गत व नाटकांतील वसंतराव व इंदिराबाई यांच्याप्रमाणें प्रत्येक विवाहित तरुण व वृद्ध यांचे मनोरथ श्रीबालकृष्ण पूर्ण करो, हीच नाटककाराची शुभेच्छा !

सर्वांचा नम्र

**गणेश दिनकर आठवले**

B. A. L. T.

भंडारा, ( सी. पी. )

" म्हातारपणचे डोहाळे " या नाटकाचा मुंबई मुक्कामांतील प्रथम प्रयोग नाट्यकलाप्रवर्तक संगीत मंडळीनें ग्रँटरोड बॉंबे थिएटरांत रविवार ता. १६।१।३८ रोजीं केला. त्यावेळीं खालील नटनटींनीं कामें केलीं—

| | | |
|---|---|---|
| **वसंतराव** | — | रा. एकनाथ रामचंद्र कुलकर्णी |
| **चंडोबा** | — | ,, विनायक गणेश मोघे |
| **नवग्रहशास्त्री** | — | ,, श्रीधर विनायक गाडगीळ |
| **मोहन** | — | ,, केशव वामन देशपांडे |
| **पिलोबा** | — | ,, दत्तात्रय बालकृष्ण भिडे |
| **अंजिऱ्या** | — | ,, नारायण चिंतामण जोग |

| | | |
|---|---|---|
| **इंदिरा** | — | ,, अच्युत पांडुरंग पाटणकर |
| **मालती** | — | ,, अंबादास विनायक आपटे |
| **छुरी** | — | ,, माधव त्रिंबक पटवर्धन |
| **पोपई** | — | मिस बनूबाई सातारकर |
| **बाळुबाई** | — | कुमारी शकुंतला भोमे |

# म्हातारपणचे डोहाळे

## अंक १ ला

### प्रवेश १ ला

इंदिरा:—( तुळशी वृंदावनाजवळ उभी असून बाळकृष्णाची प्रार्थना करीत आहे. )

करि प्रणति चरणिं ही हे नंदलाला । सुत सौख्य मज देई ॥ ध्रु० ॥ परमेशपद ठाई । मन रंगले पाही । जननी पदा नेई ॥ १ ॥ स्वर्गपद हातास । सुत देतसे खास । म्हणुनीच सुत देई ॥ २ ॥ कुलदीप जन्मास । यावाच ही आस । पुरवी ही लवलाही ॥ ३ ॥

( प्रदक्षणा घालते )

देवाधिदेवा बाळकृष्णा, आम्हाला या इहलोकीं सर्व सुख देऊन संतुष्ट केलंस, पण पुत्र सुख दिलं नाहींस, त्यामुळें आम्ही उभयतां फार उदासीन झालों आहोंत. देवा तुझ्या भक्तींत माझ्याकडून कधीं अंतर पडत नसतांना तूं आम्हाला पुत्र न देऊन नरकांत लोटणार का ? निपुत्रिकाला नरकवास प्राप्त होतो असं म्हणतात, आणि आम्हा कृष्णभक्तांना तुझ्या भक्तीबद्दल अशी स्थिती प्राप्त व्हावी, हें तुला पहावतं तरी कसं ?

**वसंतराव:**—कां लाडके, काय चाललं आहे ? या लंगड्या बाळकृष्णाची पूजा चालली आहे वाटतं ?

**इंदिरा:**—होय दिसत नाहीं वाटतं ?

**वसंतराव:**—अग सारं कांहीं दिसत आहे पण तूं हा देवधर्म करून देवाजवळ काय मागणार आहेस ?

**इंदिराः**—काय म्हणजे ! मुलगा, मुलगा मागणार आहे बरं—

**वसंतरावः**—मुलगा ! अग आतां का तुला या उतार वयांत मुलगा होणार ? खुळी कुठली.

**इंदिराः**—कां बरं ? या वयांत मला मुलगा न व्हायला काय झालं ? त्या पारुबाईला नाहीं कां मुलगा झाला या वयांत ? शिवाय मी अजून म्हातारी कां झालें आहे ? कांहीं पन्नाशी नाहीं कीं साठी नाहीं. अजून मूलबाळ होण्याचं माझं वय गेलं नाहीं बरं, अजून मी चांगली टुणटुणीत आहे. काय झाली आहे मला धाड !

**वसंतरावः**—हः हः ! अग खुळे, आतां सोड हे चाळे. म्हणे मी टुणटुणीत आहे.

**इंदिराः**—मला कांहीं धाड झाली नाहीं. तुम्ही मात्र पिकला आहांत, तरी सुद्धां तुमचंही मूल होण्याचं वय गेलं नाहीं. आत्ताशी कुठं पन्नाशी उलटली. शिवाय शास्त्रीबुवा कालच सांगत होते कीं आपल्या नशीबीं औरस पुत्र आहे म्हणून. मग असे निराश कां होतां ? आशा धरून त्या बाळकृष्णाचं भजन पूजन करा म्हणजे आपल्याला खात्रीनं मुलगा होईल. शास्त्रीबुवांचं गणित खोटं नाहीं होणार हो !

**वसंतरावः**—शास्त्रीबुवांचं गणित ? अग तो साऱ्या मुलखाचा थापाड्या. गणित कसलं नि काय ? आतां कांहीं आपल्याला मुलगा होणार नाहीं. त्या मोहनला दत्तक घेऊन टाकूं म्हणजे झालं.

**इंदिराः**—मी नाहीं दत्तक घेऊं देणार, तुम्हाला काय होतं आहे दत्तक घ्यायला ? ही १० लाखांची इस्टेट त्या भिकारड्याच्या हातांत, मी नाहीं जाऊं देणार. साफ सांगून ठेवतें कीं सारी इस्टेट माझ्या औरस पुत्रालाच मिळाली पाहिजे म्हणून.

**वसंतरावः**—पण मला कांहीं मुलगा व्हायची आशा दिसत नाहीं.

**इंदिराः**—कां बरं ? अजून आशा आहे, चांगले वागाल तर अजून मुलगा होईल, रोज सकाळीं मेलं आटीव दूध पीत जा म्हणतें तर कधीं प्यायचं नाहीं, बदामाचा शिरा खा म्हणतें तर खायचा नाहीं, २।४ मैल हिंडून येत जा म्हणतें तर जायचं नाहीं, मग कसा होईल मुलगा ? हो कधीं देवाचं नांव तरी घेतां ? त्याला स्मराल तर होईल मुलगा.

**वसंतरावः**—अग, देवालाच जर आपली विस्मृति पडली आहे तर मी तरी कशाला त्याला स्मरूं ? मी आपला दत्तक घेऊन मोकळा होतों झालं.

**इंदिराः**—पण मी त्याला दत्तक घेऊ देणार नाहीं.

**बंडोबाः**—( येऊन ) कां बरं ! दत्तक घ्यायला काय हरकत आहे ? तुमचं दोघांचं आतां उतारवय झालेलं, तेव्हां तुम्हाला कुळाचं नांव चालविण्यासाठीं दत्तक घेतलेलाच बरा. मोहन तुमचा पुतण्या आहे, घेऊन टाका मांडीवर !

**वसंतरावः**—हो, मी तरी तेंच म्हणतों, कीं दत्तक घेतलेलाच बरा.

**इंदिराः**—पण मी घेऊं द्यायची नाहीं.

**नवग्रहः**—( येऊन ) आणि मीही दत्तक घेऊं देणार नाहीं. दत्तक काय म्हणून ? येत्या चातुर्मासांत बाईसाहेबांना औरस पुत्र ठेवलेला, तेव्हां दत्तक घेण्याची मुळींच जरूरी नाहीं. अहो माझं ज्योतिष सांगतं कीं बाई-साहेबांना मुलगाच होणार ! सगळे नवग्रह कंठशोष करून सांगतात कीं बाईसाहेबांना पहिला मुलगाच होणार. तेव्हां आतां दत्तक घेण्याची मुळींच जरूरी नाहीं !

**वसंतरावः**—मग कसं काय बंडोबा-आतां कसं काय ?

**इंदिराः**—अहो त्यांना काय विचारतां ? तो मोहन आपला कोणीही नाहीं, आणि मी त्याला दत्तक घेऊं द्यायची नाहीं.

**बंडोबाः**—कां बरं असं कां म्हणतां ? मोहन चुरमुरे हा मधुकरराव चुरमुरे यांचा मुलगा आहे. आणि मधुकर चुरमुरे तर वसंतरावांचा सावत्र भाऊ आहे.

**नवग्रहः**—साफ झूट ! एकदम झूट !! अजीबात झूट !!! मोहन चुरमुरे हा वसंतराव चुरमुऱ्यांचा कोणीही नाहीं नुसतीं आडनावं एक असलीं म्हणून काय झालं ? नुसतीं आडनांवं एक असलीं म्हणजे जवळचा नातेसंबंध असतोच असं कांहीं नाहीं, शिवाय बाईसाहेबांना औरस पुत्र होणारच ! हें भविष्य तर अस्मादिकांनीं वर्तवलंच आहे. तेव्हां दत्तक घेण्याची मुळींच जरूरी नाहीं.

**बंडोबाः**—आतां कुठून होणार औरस पुत्र ? आणि आतां झाला, तरी त्याचा काय उपयोग ? शास्त्रीबुवा हा लेख पाहिलांत कां ? हा लेख रावसाहेबांनीं लिहून दिला आहे. ह्यावर त्यांची स्वतःची सही असून त्यांच्या त्या पिलोबा कारकुनाची साक्ष आहे. आतां या लेखावर बाईसाहेबांची सही झाली कीं झालं ! या लेखान्वयें आजपासून एक वर्षाच्या आंत जर बाईसाहेबांना औरस पुत्र न झाला तर त्यांची दहा लाखांची इस्टेट मोहन चुरमुरे ह्याला मिळणार आहे. समजलांत ? बाईसाहेब हा लेख वाचून पहा आणि त्यावर सही करा.

**इंदिरा**:—( लेख पाहून ) अहो ! काय केलंत हें ? मला औरस पुत्र होणार ही गोष्ट खरी असतांना तुम्ही मोहनला इस्टेट दान देण्याचा हा लेख लिहिण्याची एवढी घाई काय म्हणून केलीत ?

**पद**

**कशि मति काशि पडलि हि अशी कुलविनाशी । दुस्तर मोहीं बुडलीशी ।। धृ० ।। औरस मुलगा नशिबीं असतां । अवदसा कशी आठवली अशी । दुर्दिन मजला दाविशी ।। १ ।।**

**वसंतराव**:—कां म्हणजे ? अग म्हातारपणीं जवळ कुणी पाहिजे कां नको ? शिवाय कुळाचं नांव नको कां चालायला ? पुत्र न झाला तर नरकांत जाऊं कीं काय ?

**इंदिरा**:—आतां काय सांगू माझं कपाळ ? या बंडोबानं तुम्हाला चांगलीच कींहो भुरळ घातलीन ! बंडोबा तो लेख द्या पाहूं इकडे ! मी त्याच्या फाडून चिंधड्या करते.

( पिलोबा येऊन उभा राहतो. )

**बंडोबा**:—चिंधड्या ! बाईसाहेब हा लेख रावसाहेबांनीं लिहून दिला आहे, त्यावर त्यांची स्वतःची सही असून तुमच्या पिलोबा कारकुनाची साक्ष आहे. हा लेख हा बंडोबा तुम्हाला आतां प्राण गेला तरी देणार नाहीं. तुमची एक सही नसली तरी चालेल. या लेखान्वयें आजपासून एक वर्षाच्या आंत जर तुम्हाला औरस पुत्र न झाला तर तुमची दहा लाखांची इस्टेट मोहनच्या घशांत गेलीच म्हणून समजा ( जाऊ लागतो. )

**नवग्रह**:—काय बंडोबा, लेख मुकाट्यानें देतां कीं नाहीं ?

**बंडोबा**:—नाहीं देत !

**नवग्रह**:—काय ?

**बंडोबा**:—देत नाहीं.

**वसंतराव**:—शास्त्रीबुवा थांबा भांडू नका, पण मी असं म्हणतों की लेख घेऊनच काय करायचं आहे ? जर मला एक वर्षांत औरस पुत्र झाला, तर इस्टेट कांहीं मोहनला जात नाहीं ना ?

**इंदिरा**:—आणि न झाला तर जाणार ना ?

**वसंतराव**:—हो !

**इंदिरा**:—हो ! पण मी म्हणतें असा लेख लिहून द्यायला, सांगितलं होतं कुणी ? फुटलंग बाई माझं कपाळ–!

**नवग्रह**:—बंडोबा मुकाटयानं लेख देतां कीं तुमचा प्राण घेऊं ?

**बंडोबा**:—( पिस्तुल दाखवून ) खबरदार–( जातो. )

( पडदा पडतो. )

---

## प्रवेश २ रा

( **रस्ता**:—मोहन व मालती. )

**मोहन**:—कायग या बंडोबाचं आपल्यावर इतकं प्रेम जडलं तरी कसं ? मला तर कांहींच समजत नाहीं.

**मालती**:—अहो न जडायला काय झालं ? आज दोन वर्षं झालीं, ते आपल्याकडे रोज येतात, प्रेमानं बोलतात—आपल्या चांगुलपणावर ते लुब्ध झालेले दिसतात. तशांतून त्यांना नाहीं मूलबाळ, तेव्हां त्यांच्याजवळ जें कांहीं असेल नसेल तें तुम्हांला देऊन टाकण्याचा त्यांचा विचार असेल, म्हणून तर त्यांनीं आपल्याला घराकडे मुद्दाम बोलावलं आहे.

**मोहन**:—पण त्यांची इस्टेट अशी आहे तरी किती ? ते तर दरिद्री दिसतात, आणि पत्रांत तुमचा मोठा लाभ आहे, सायंकाळीं ५ वाजतां उभयतांनीं माझ्या घरीं जरूर भेटावं असं कसं लिहितात ? काय गौडबंगाल आहे कोण जाणें ! ( पिलोबा येतो. )

**पिलोबा**:—( स्व. ) काय दुष्ट आहे हो हा बंडोबा. रावसाहेबांच्यावर पिस्तूल रोखून चालता झाला.

**मोहन**:—( मालतीस ) हा काय बडबडतो आहे ?

**पिलोबा**:—रावसाहेबांची इस्टेट त्या मोहनच्या घरांत पडावी, असं या डांबिसानं लिहून तरी कां घेतलं ? ( विचार क० ) हा समजलों त्या मोहनच्या तरुण बायकोवर या थेरडयाची नजर आहे म्हणे. आणि म्हणूनच तिला श्रीमंत बनविण्याची या थेरडयाची ही सारी खटपट दिसते.

**मालती**:—अगबाई !

**मोहन**:—थांबा, पिलोबा थांबा !

**पिलोबा**:—नमस्कार, मोहनराव नमस्कार.

**मोहनः**—नमस्कार राहूं दे, तुम्ही आत्तां काय बडबडलांत ? माझ्या बायकोवर कोणत्या थेरडयाची नजर आहे ? काय ? बोला, हें काय कारस्थान आहे ?

**पिलोबाः**—कांहीं नाहीं, कांहीं नाहीं, मला नाहीं माहीत, ही थोरामोठयांच्या घरचीं कारस्थानं, मी आपला गरीब कारकून—जाऊं द्या मला.

**मोहनः**—थांबा, बंडोबाबद्दल आत्तां तुम्हीं काय पुटपुटलांत ? बोला आतां मी तुम्हाला तसा जाऊं देत नाहीं.

**पिलोबाः**—कांहीं नाहीं ! कांहीं नाहीं ! तो बंडोबा मोठा लबाड आहे, त्यानं रावसाहेबांकडून तुमच्या नांवाचा इस्टेट दानाचा लेख लिहून घेतला आहे. आजपासून एक वर्षाच्या आंत रावसाहेबांना औरस पुत्र न झाला तर त्यांची इस्टेट तुम्हाला मिळणार आहे.

**मोहनः**—अस्सं काय ? आणि बंडोबाचं हिच्यावर लक्ष आहे म्हणतां ? अं !

**पिलोबाः**—होय, तशी गावांत बोलवा आहे, मी कांहीं डोळयांनीं पाहिलं आहे थोडच !

**मालतीः**—बाई, बाई,—काय हा माझ्यावर आरोप ?

**मोहनः**—मालती, तुझा कावा समजलों, त्या बंडोबाचं कारस्थान, आत्तां माझ्या लक्षांत आलं, मी त्याच्या घरीं मुळींच जात नाहीं आणि तुलाही जाऊं देत नाहीं. सटवे, त्या थेरडयाशीं अनाचार वर्तन करतेस ? चल हो घराकडे !

**मालतीः**—महाराज, माझ्यावर उगीच आग कां पाखडतां ? त्या हरामखोराचं काय कारस्थान आहे मला ठाऊक सुद्धां नाहीं.

(नवग्रह शास्त्री येतो.)

**नवग्रहः**—काय मोहनराव काय झालं तरी काय ? असे बायकोवर रागावतां काय ?

**मोहनः**—काय सांगू शास्त्रीबुवा. माझा नि त्या रावसाहेब चुरमुऱ्याचा कांहीं एक संबंध नसतांना, त्या बंडयाला—त्या गाढवाला रावसाहेबांची इस्टेट माझे नावानं लिहून घेण्याची काय जरूरी होती ? त्या थेरडयाची हिच्यावर नजर आहे, आणि म्हणूनच हिला एकदम श्रीमंत बनवून, हिच्या जिवावर चैन करण्याचा त्या डांबिसाचा डाव आहे. अहो मला त्यानं आज घराकडं बोलावलं आहे तें याच करतां.

**नवग्रहः**—मोहनराव, बंडोबाचं कृष्णकारस्थान आत्तां माझ्या लक्षांत आलं, बंडोबा तुमचा कोणीही नाहीं ना ?

**मोहनः**—माझा कोणी नाहीं, पण हिचा तो आहे ना ?

**मालतीः**—काय बोलतां ! नाथ काय हा गहजब ! या गरीब गाईवर विनाकारण तोहमत कां घेतां ? माझं आचरण धुतलेल्या तांदुळाप्रमाणं शुद्ध आहे. शास्त्रीबुवा, माझ्यावर कुणाचीही नजर नाहीं आणि मी कुणाच्याही फंदांत सांपडणार नाहीं !

**मोहनः**—हो हो तर–सीता–तारा–द्रौपदी यांच्या यादींत तुझं नांव घालण्या-इतकी तूं शुद्ध आहेस बरं ! अग तुझ्याशीं त्या बंडोबाचा असला संबंध आहे–म्हणूनच त्यानं त्या रावसाहेबांची इस्टेट तुझ्या घरांत कोंबण्याचा प्रयत्न केला आहे. नाहींतर माझा रावसाहेबांशीं कांहींएक संबंध नसतांना मी त्यांचा पुतण्या आहे, म्हणून तो बंडोबा उगाच सांगत सुटतो ?

**नवग्रहः**—मोहनराव, या गरीब गाईवर उगीच तोहमत घेऊं नका, या साध्वीच्या अंतःकरणाला दुखवूं नका. तुम्ही रावसाहेबांचे कोणी नाहींना ?

**मोहनः**—मी त्यांचा कोणीही नाहीं.

**नवग्रहः**—तर मग मी सांगतों असं करा. आत्तांच्या आत्तां माझ्याबरोबर कचेरींत चला. बंडोबानं रावसाहेबांच्याकडून लिहून घेतलेल्या लेखाला हर-ताळ फासण्यासाठीं तुम्ही असा लेख लिहून द्या कीं–" मी वसंतराव चुर-मुऱ्यांचा कोणीही नाहीं. मला त्यांच्या इस्टेटींतील सुतळीचा तोडाही नको."

**मालतीः**—खरंच गडे, असा लेख अवश्य लिहून द्या.

**मोहनः**—ठीक आहे. त्या दुष्टाचं कारस्थान हाणून पाडण्यासाठीं, मला असं करणं भागच आहे.

**मालतीः**—महाराज, त्या मेल्याचं कारस्थान समजलं बरं ! इस्टेटीची लालूच दाखवून माझ्यावर झडप घालण्याची बुद्धी झाली असेल–हेंच खरं.

**नवग्रहः**—मोहनराव–मालतीबाई म्हणतात तसंच असलं पाहिजे. तुम्ही माझ्याबरोबर एकदम कोर्टाकड चला. मालतीबाई तुम्ही पिलोबाबरोबर घराकडे चला. मोहनराव पाय उचला. ( दोघे जातात. )

**मालतीः**—पिलोबा–पाहिलंत त्या चांडाळाचं कवटाळ ?

**पिलोबाः**—जग हें असं आहे बाईसाहेब. करतां कसं ? चला घराकडे, त्या चांडाळाला पुन्हां घरांत पाऊलसुद्धां ठेऊं देऊं नका.

**मालतीः**—आत्तां तो थेरडा आला कीं त्याची चांगलीच हजेरी घेईन. देवा तुझ्याशिवाय आतां मला कोणाचा बरं आधार आहे ?

### पद

जगदीशा दीनोद्धारा। प्राणिमात्र निर्मोनी। जगी त्यास प्रेमपूर्ण। सौख्य देसा भारी ॥ धृ० ॥ अबलांचा तू त्राता साचा। पाश करी दुरी अपमानाचा। लीन होई दासी पायालागी ॥ १ ॥

( जाते. )

---

## प्रवेश ३ रा

( बगीच्या )

**वसंतराव**:—काय करावं नी काय नाहीं कांहीं समजत नाहीं. हा बंडोबा कोण असावा? माझी इस्टेट त्या मोहनच्या घरांत जावी, अशी याची दृढ इच्छा कां म्हणून असावी? मुलगा व्हावा म्हणून मी थोडे का प्रयत्न केले? नवग्रह शास्त्री म्हणतात तुम्हाला मुलगा होईल म्हणून, पण माझा कांहीं ज्योतिषावर भरंवसा नाहीं, परवाच्या त्या भयंकर प्रसंगापासून आमची ही तर अगदीं भेदरून गेली आहे. हा बंडोबा माझा सावत्र भाऊ मधुकर तर नसेल ना? काय असेल देव जाणे. आमच्या बायकोनं मुलगा होण्यासाठीं कमी का प्रयत्न केले? गंडे बांधले, ताईत गळयांत घातले, अंगारे लावले, धुपारे जाळले, पिंपळाचे पार तुडवले, मंत्र तंत्र जादू टोणा सर्व कांहीं केलं. सवाष्णी बसवल्या, ब्राह्मण उठवले, पण कांहीं उपयोग झाला नाहीं. देव तरी असा कसा इतका निष्ठुर झाला कोण जाणे? द्रव्याचा सुकाळ तर पोरांचा दुष्काळ आणि द्रव्याची वाण असू द्या कीं पोरांची नुसती खाण असते. असं आहे हें देवाच्या घरचं त्रांगडं.

**पिलोबा**:—( येऊन ) रावसाहेब टाळी द्या, टाळी द्या.

**वसंतराव**:—म्हणजे असं झालं तरी काय?

**पिलोबा**:—घरीं चला, सर्व कांहीं सांगतों. हें बघा. शास्त्रीबुवांनीं त्या मोहन-कडून–“ मी वसंतरावाचा कोणीही नाहीं–मला त्यांच्या इस्टेटीपैकीं सुतळीचा एक तोडाही नको– ” असा लेख लिहून घेतला आहे. आतां तुम्हाला मुलगा न झाला तरी इस्टेट कांहीं मोहनला जात नाहीं.

**वसंतराव**:—हं पिलोबा, “ मला मुलगा झाला पाहिजे ” असं तूं सारखं

म्हणत राहिलं पाहिजे. "मला मुलगा न झाला तरी चालेल" असं म्हणालास तर तुला नोकरीवरून दूर करीन.

**पिलोबाः**—बरं बुवा राहिलं. तुम्हांला मुलगाच झाला पाहिजे असं मी सारखं म्हणत राहीन. मग तर झालं ?

**वसंतरावः**—बरं पण कायरे पिलोबा तुला कांहीं मूल बाळ ?

**पिलोबाः**—काय सांगू रावसाहेब मला बरेच दिवस मूलच होत नव्हतं, पण माझ्या बायकोला एका वैदूनं हिमालयांत रहाणाऱ्या एका सिद्धानं दिलेली एक मुळी खायला दिली तेव्हां कुठं मूल झालं.

**वसंतरावः**—अरे मग गध्या मला कां देत नाहींस ती मुळी ? तुला माहीत नाहीं—कीं मला मुलगा व्हावा म्हणून मी रात्रंदिवस खटपट करतो आहे—तें ?

**पिलोबाः**—पण काय करूं रावसाहेब आजकाल तो काडे चिरायती वैदू कुठं दिसतच नाहीं. तो जर कधीं दिसला तर त्याच्याकडून ती मुळी अवश्य घेईन.

**वैदूः**—( आंतून ) वाईचा वखत, वाताचा वखत, दाताचा वखत, घ्यारे—धमासा घ्यारे बत्तिसा घ्यारे वखत.

**पिलोबाः**—हां रावसाहेब, हाच तो वैदू–रावसाहेब तुम्ही मोठे भाग्यवान ! अरे ए वैदू, ए वैदू, अरे असा इकडून ये. ( तो येतो. ) हां रावसाहेब हाच हाच तो वैदू !

**वसंतरावः**—कायरे वैदू, तुझ्याकड एखादं मुलगा होण्याचं औषध आहे का ? असलं तर मला पाहिजे आहे.

**वैदूः**—हो-हो, आहे कीं, हिमालयांतल्या एका सिद्धानं ही एक वनस्पती दिली आहे. हिनं मुलगा होतो—ही पहा. ( दाखवतो. )

**पिलोबाः**—( पाहून ) हां हां हीच मुळीं—ह्याच वैदूनं माझ्या बायकोला दिली, पण रावसाहेब ही मुळी खाऊन तिला मुलगा झाला नाहीं तर मुलगी झाली.

**वसंतरावः**—काय म्हणालास ? मुलगी झाली ? मुलगा नाहीं झाला ? मग ही मुलगी होणारी मुळी मला मुळींच नको. अरे वैदू तुझ्यापाशीं मुलगा होणारी मुळी असली तर दे.

**वैदूः**—अहो रावसाहेब या मुळीनं मुलगा सुद्धां होतो.

**पिलोबा**:—चल गध्या, रावसाहेब घेऊ नका ही मुळी. अहो ही मुळी बाईसाहेबांनीं खाल्ली तर—

**वैदू**:—खाल्ली तर काय ? खाल्ली ! मी आतांच १२ रुपये घेऊन ही मुळी दुधांत उगाळून बाईसाहेबांना प्यायला दिली.

**वसंतराव**:—काय—काय ? ही मुळी तूं तिला खायला दिलीस ? गध्या तुला कुणी सांगितलं रे हें ?

**वैदू**:—त्या बंडोबा खुळखुळ्यानं मला १२ रुपये दिले आणि ही मुळी बाईसाहेबांना द्यायला सांगितली, अन् मी दिली !

**वसंतराव**:—पाहिलंस पिल्या, त्या बंडयाचं कारस्थान ! त्यानं ह्या सालममिश्रीच्याला माझ्या घरीं पाठवून, ही मुळी तिला खायला घातली—आतां कसं करायचं रे ?

**वैदू**:—अहो रावसाहेब घ्या, ह्या मुळीनं मुलगा सुद्धां होतो. घ्या—घ्या ! !

**पिलोबा**:—कशाला घ्या ? रावसाहेब घेऊं नका ! अहो माझ्या बायकोनं ही मुळी खाल्ली म्हणून तर तिला लागोपाठ तीन पोरी झाल्या !

**वसंतराव**:—काय तीन पोरी ! गध्या—चल निघ—निघतोस कीं नाहीं ? ( वैदू जातो ) पिलोबा चल आधीं, घरीं चल—तिला ओकारीचं औषध देऊं, नाहींतर मिस छुरी, नाहींतर डॉक्टर पेननाईफ यांना बोलावून आण, नाहींतर फटकन दिवस राहून मुलगी व्हायची—चल—चल. ( जातात. )

## प्रवेश ४ था

( मोहनचें घर )

**मालती**:—अजून स्वारी कशी बरं घरीं परत आली नाहीं ? रावसाहेबांची इस्टेट आमच्या नांवानं होणार होती का ? देवा असं जर झालं तर किती बरं होईल !

### पद

**वैभवा कधीं पाहुं डोळा जाहला आजि भोळा जीव**
**गोळा ॥ धृ० ॥ कमल विकासी सविता लाभतां प्रखर**
**असुखकर नच आवडता चंचल कमला स्थिर ना**
**राहता—लोल होऊनि झुलवी मनाला ॥ १ ॥**

पण हा बंडोबा आमच्या बाजूनं खटपट तरी कां करतो ? हा बंडोबा माझा

सासरा मधुकर तर नसेलना ? पण छे, तसं असतं तर त्यानं केव्हांच जाहीर केलं असतं. पण पुरुषांचा तरी काय नेम सांगावा ? (पाहून) अगबाई हा थेरडा आलाच कीं एकदम आंत.

**बंडोबाः**—(येऊन) मालती मोहन कुठें गेला आहे ?

**मालतीः**—मला माहीत नाहीं !

**बंडोबाः**—माहीत नाहीं ? माझ्यापासून लपवून ठेवतेस ? नवग्रह शास्त्र्याबरोबर तुझा नवरा कुठं गेला आहे ?

**मालतीः**—मला माहीत नाहीं. पण तुम्ही बाहेर व्हा पाहूं. घरचे पुरुष बाहेर गेले असतांना परकी पुरुषांनीं थेट घरांत येणं शोभत नाहीं, तुम्हीं बाहेर व्हा.

**बंडोबाः**—बाहेर होऊं ? आणि तो काय म्हणून ? मालती तूं मला समजतेस तरी कोण ? अग मोहनचं जें घर तेंच माझं घर. मालती हा लेख पाहिलास ? ह्या लेखानं तूं इंद्राची इंद्राणी होशील, हत्ती घोडे तुझ्या दाराशीं झुलत राहतील. दासदासी तुझ्या सेवेला तत्पर राहतील. भिकारड्या मोहनचं नशीब उदयाला आणण्याचं सारं श्रेय मला आहे. ये अशी जवळ ये आणि शंका न ठेवतां हा लेख वाचून पहा.

**मालतीः**—नीचा, दुरात्म्या, तुझं कृष्ण कारस्थान केव्हांच माझ्या लक्षांत आलं आहे. पैशाची लालुच दाखवून माझ्या अब्रूवर गदा घालण्याची दुष्ट वासना धरून तूं इथं आला आहेस हें मी ओळखून आहें. तूं अगोदर बाहेर हो.

**बंडोबाः**—अग सटवे, तूं माझं ऐकत नाहींस काय ? पण ध्यानांत ठेव माझ्या पाया पडत नाक घाशीत येशील. तुझ्या बऱ्याकरतां माझे सारे प्रयत्न. आणि तुला असे भिकेचे डोहाळे आठवले अं ?

**मालतीः**—तूं इथून निघून जातोस कीं जीभ हासडून प्राण देऊं का तुझाच प्राण घेऊं (त्याच्या अंगावर जाते.)

**बंडोबाः**—(पिस्तुल रोखून) खबरदार—

**मालतीः**—अगबाई ! (भीतीनं दूर होते.)

**मोहनः**—(येऊन) काय पहातो मी हें ? बंडोबा.

**मालतीः**—या नीचाला अगोदर घालवून द्या, हा मांग माझी अब्रू घेऊं पाहातो आहे !

**बंडोबाः**—काळ सर्पिणी काय बोलतेस हें ? वृद्ध सासऱ्याला अपशब्द बोलून त्याच्यावर असा वृथा आरोप कां घेतेस !

**मोहनः**—बंडोबा, पिस्तुलाचं भय दाखवून माझ्या बायकोवर बलात्कार करतां काय ? मलो तरी बेहेत्तर, पण बायकोची अब्रू घेणारा तूं प्रत्यक्ष माझा जरी बाप असलास तरी ( नरडी दाबण्यास जातो. )

**बंडोबाः**—( पिस्तुल दाखवून ) खबरदार ! मोहन घाबरूं नकोस—मीच—मधुकर चुरमुरे ( प्रगट होऊन ) वसंताचा सावत्र भाऊ, तुझा बाप आणि मालतीचा सासरा आहे.

**मोहनः**—काय तुम्ही माझे बाबा ?

**बंडोबाः**—होय मीच तो तुझा दुर्दैवी बाप. आज २० वर्षे फरारी होऊन, गुप्त वेशानं बंडोबा खुळखुळे ह्या नांवानं जगांत वावरतों आहे. वसंताची सारी इस्टेट तुझ्या हातीं येण्याचे माझे प्रयत्न यशस्वी झाले आहेत. शंका न ठेवतां हा लेख वाचून पहा.

**मोहनः**—काय तुम्ही माझे बाबा ? बोला बंडोबा बोला. हें जर खरं असेल तर मात्र मी ठार बुडालों. माझा सर्वस्वी घात झाला.

**बंडोबाः**—तो कसा ? मूर्खा तुला १० लाखाची इस्टेट नको का ? लक्ष्मी-पुत्र होण्याच्या ऐन संधीला ही तुला अवदसा कशी आठवली ?

**मालतीः**—काय खरोखर का तुम्ही माझे मामंजी ?

**बंडोबाः**—अग हो मी तुझा सासराच आहे बरं !

**मोहनः**—तर मग बाबा, मी खरा दुर्दैवी आहे. तुमचं हें कारस्थान विपरीत समजून, शास्त्रीबुवाबरोबर कोर्टांत जाऊन मी हा लेख रजिस्टर करून दिला.

**बंडोबाः**—पाहूं-पाहूं काय आहे तो लेख ? ( पाहून ) अरे कार्ट्या काय केलंस हें ? मालती फुटलं तुझं नशीब. दहा लाखाची मालकीण झाली असतीस पण तुझ्या ह्या मूर्ख नवऱ्यामुळें तुझं वाटोळं झालं !

**मालतीः**—मामंजी, त्या नवग्रहशास्त्र्यानं आमचा भलताच गैरसमज करून दिला. तुमची माझ्यावर पापी नजर आहे, असं इकडच्या मनांत भरवून दिलं म्हणूनच इकडच्या हातानं हा असा लेख लिहिला गेला आहे.

**मोहनः**—बाबा, मी तुमच्या खटपटीला हरताळ फासला. मला क्षमा करा. ( पाया पडतो. )

**बंडोबाः**—( रागानं ) चालून आलेली गजांतलक्ष्मी लाथाडणाऱ्या भिकारड्या, जा यापुढं तुझं तोंड पहाण्याचीसुद्धां माझी इच्छा नाहीं.

( लाथाडून निघून जातो. )

---

## प्रवेश ५ वा

( रस्ता—पोपई व अंजिऱ्या )

**पोपई:**—अंजिऱ्या बाईसाहेबांना म्हणे ओकाऱ्यावर ओकाऱ्या सुरू झाल्या आहेत. असा रोग तरी कोणता झाला आहे त्यांना ?

**अंजिऱ्या:**—अग तुला पोरीला तो रोग काय समजणार ? तूं पडलीस कुवार, लग्न करून संसारांत पडशील, तेव्हां समजेल तुला ओकाऱ्या म्हणजे काय तें. म्हणून म्हणतों कीं, जगाचं ज्ञान करून घेण्यासाठीं आतां तूं माझ्यासारखा एखादा प्रेमाचा सवंगडी जवळ कर, पण तुझ्या तें लक्षांतच येत नाहीं, पण मी मात्र तूं माझी बायको होशील म्हणून सारखा झुरणीला लागलों आहे.

**पोपई:**—पण तूं माझ्या काय नादीं लागतोस ? माझ्याशिवाय दुसरी एकादी नाहीं का तुला बायको करून घ्यायला ? मला कांहीं लग्न करायचं नाहीं, नि पुरुषांच्या ताब्यांत मुळींच राहायचं नाहीं. जगांत मी अगदीं स्वतंत्रपणें रहाणार आहे. पुरुषांचं वर्चस्व, नकोग बाई मला.

**अंजिऱ्या:**—हं, अग हे विचार कुठपर्यंत. अंगातल्या जवानीला ऊत आला म्हणजे आठवतील म्हटलं पुरुषी डोहाळे. मग म्हणशील कीं घसरत होतें पण सावरलें.

**पोपई:**—मी नाहीं घसरणार नि मला सावरायलाही पण कुणी नको. स्त्री पुरुषांच्या संसारांत कांहीं सुख नसतं बरं.

**अंजिऱ्या:**—अस्सं, अग आपले मालकच पहाना, मुलगा व्हावा म्हणून सारखे धडपडताहेत. बाईसाहेबसुद्धां मुलगा व्हावा म्हणून तडफडताहेत. बाईसाहेबांना ओकारी सुरू झाली आहे हें सुचिन्हच आहे बरं कां ? त्यांना मुलगा होईल याचं ओकारी हें पूर्वचिन्ह आहे समजलीस.

**पोपई:**—पण मुलगाच होईल असं तूं कशावरून म्हणतोस ?

**अंजिऱ्या:**—अग बाईसाहेबांची तशी इच्छा आहे म्हणून. जशी वासना तसं फळ मिळतं.

**पोपई:**—असं कांहीं नाहीं, मी म्हणतें फारा दिवसांनीं दिवस राहिले आहेत, तेव्हां त्यांना मुलगीच होईल.

**अंजिऱ्या:**—लावतेस पैज ?

**पोपई:**—लावतें.

**अंजिऱ्या:**—पहा बरं ? पैज हरलीस तर तुला माझ्याशीं लग्न करावं लागेल.

**पोपई**:—करीन—

**अंजिऱ्या**:—मग सांग पाहूं बाईसाहेबांना काय होईल तें ?

**पोपई**:—सांगू ? पहा बरं सांगूच कां ?

**अंजिऱ्या**:—सांग खुशाल सांग.

**पोपई**:—मुलगी.

**अंजिऱ्या**:—हं मुलगी, अग हें काय बरळतेस ?

**पोपई**:—कां बरं ? बाईसाहेबांना झाली तर मुलगीच होईल.

**अंजिऱ्या**:—आणि मुलगा झाला तर—

**पोपई**:—मुलगा झाला तर मी हरेन नी तुझ्याशीं लग्नाला कबूल होईन.

**अंजिऱ्या**:—पहा बरं दे टाळी.

**पोपई**:—ही घे ( दोघे हात घट्ट धरतात. पिलोबा येतो. )

**अंजिऱ्या**:—पाणिग्रहण—पाणिग्रहण ( पद )

> **मनहर माझि नार । कशि खुले गुलजार । तुझ्या लाव-**
> **ण्याचा भर काय फिरवी नयन गरगरा । बहुमोलाचा**
> **हा हिरा । पोपई ॥ १ ॥ चल आवरि नजर । तिंत भरलं**
> **जहर । कसा करिसि कहर । माझें मन डोले भिर भिरा ।**
> **तू खराचरे गोजिरा । अंजिऱ्या ॥ २ ॥**

**पिलोबा**:—शुभमंगल सावधान.

**पोपई**:—अरे मेल्या सोड माझा हात.

**अंजिऱ्या**:—तुझा हात माझ्या हातांत आल्यावर तो मी कसा सोडीन ?

**पोपई**:—हेरे काय अंजिऱ्या ?

**अंजिऱ्या**:—पाणिग्रहण, लग्नाचा वाङ्निश्चय.

**पिलोबा**:—शुभमंगल सावधान—

**पोपई**:—( हात सोडवून ) हेरे काय ? पैज हरलें तरच मी तुझ्याशीं लग्न करीन, पैजेचा निकाल होईपर्यंत नाहीं हो.

**अंजिऱ्या**:—पिलोबा, तुम्ही सारा घोटाळा केलांत. कशाला आलांत या वेळीं इथं ?

**पिलोबा**:—पण ही पोपई कुठं तुझ्यावर खूष आहे ? तिला माझ्यासारखा, लेखणीबहाद्दर नवरा पाहिजे असेल. मी कारकून आणि तूं हुजऱ्या.

**पोपई:**—मला मुळीं पुरुषाबरोबर लग्नच करायचं नाहीं.

**अंजिन्या:**—ऐकलंत कां पिलोबा !

**पिलोबा:**—ऐकलं–पण तूं आहेस धटिंगण, नाजूक पोरींना पकडींत कसं आणावं, याचं तुला ज्ञान नाहीं. हें काम तूं माझ्याकडं सोपीव, म्हणजे मी हिला बघ कशी वश करून घेतों ती ?

**अंजिन्या:**—ठीक आहे. ही कामगिरी मी तुमच्याचकडे सोपवतों.

**पिलोबा:**—आणि हें पहा तुझ्याकडं एक कामगिरी मी देतों. अरे अंजिन्या बाईसाहेबांना वेड लागलं वेड.

**अंजिन्या:**—काय वेड लागलं ?

**पिलोबा:**—खरंच वेड लागलं आहे. आधीं पळ नी मिस् छुरीला नाहीतर डॉ. पेन्‌नाईफला तरी पुढं घालून आण चल उचल पाय.

**अंजिन्या:**—अर्र्र् पोपई आतां कसला मुलगा नि कसली मुलगी ?

**पोपई:**—पाहिलंत हें संसाराचं सूख. मी नाहींग बाई लग्न करणार !

**पिलोबा:**—अरे जा म्हणतोना ? मिस् छुरीलाच पुढं घालून आण.

**अंजिन्या:**—आणतों. मिस् छूरीलाच पुढं घालून आणतों. पण पिलोबा हिच्याशीं जरा बेतानंच घ्या बरं कां ! ही सुद्धां मिस् छूरीच आहे.–( जातो. )

**पिलोबा:**—तें मी पाहून घेईन. गेला. बरं झालं पिडा टळली. पोपई, खरंच का तुझ्या मनांतून पुरुषाशीं लग्न करायचं नाहीं ? सुंदरी—

**पोपई:**—हं, असा लघळपणा कामाचा नाहीं. माझी नि अंजिन्याची पैज ठरली आहे. जर मी पैजेंत हरलें, तर त्याच्याशीं माझं लग्न होण्याचं ठरलं आहे.

**पिलोबा:**—आणि तो जर पैजेंत हरला तर ?

**पोपई:**—तर मी त्याच्याशीं लग्न करण्यासाठीं बांधलेली नाहीं.

**पिलोबा:**—असंचना ? मग मी सांगतों की तो पैजेंत खात्रीनं हरणार आणि तूं माझी होणार. हे चारुगात्री नयनमोहिनी—( वसंतरावास पाहून ) अरे बापरे पळ पोपई पळ. ( वसंतराव येतात ) ( पोपई जाते. )

**वसंतराव:**—शेवटीं हा बंडोबा कोण हें नाहीं अजून उमगत. हा बंडोबाच माझा भाऊ मधुकर असावा असा मला संशय—

**शास्त्रीबुवा:**—तो कोणी कां असेना ? पण मी तर मोहनकडून " मी राव-साहेबांचा कोणीही नाहीं " असा लेख रजिस्टर करून घेतला आहे. तेव्हां

आतां त्या बंडयाची भीती बाळगण्याचं कांहींच कारण नाहीं, शिवाय येत्या चातुर्मासांत बाईसाहेबांना औरसपुत्र होणार आहे.

**वसंतराव**:—तर मग मी निर्धास्त राहूं म्हणतां ?

**नवग्रह**:—अगदीं निर्धास्त रहा.

**पिलोबा**:—रावसाहेब, पळा, धावा, धूम ठोका, बाईसाहेबांना वेड लागलं बघा. अहो त्यांनीं घरांत हें फेंक तें फेंक असं सारखं सुरू करून घराचा नुसता उकिरडा बनवला आहे. आतां कसचा मुलगा नी कसची मुलगी ?

**नवग्रह**:—काय बाईसाहेबांना वेड लागलं ?

**पिलोबा**:—होय हो.

**नवग्रह**:—छट्, आतां तर बाईसाहेबांना पुत्ररत्न होण्याचा काळ समीप आला आहे.

**वसंतराव**:—अहो पण वेड लागून त्यांतच तिचा अंतकाल होणार असला तर कुठला मुलगा नि कुठलं काय ?

## प्रवेश ६ वा

( दिवाणखाना. )

**इंदिरा**:— **पद**

**पूर्ण झाली कामना । येई देवाच्या मना ॥ धृ० ॥ धन्य**
**झालें या क्षणा । तृप्ति माझ्या लोचना ॥ १ ॥ झालि**
**सेवा साधना । मीहि झालें पावना ॥ २ ॥**

सगळे स्त्रीलिंगी जिन्नस फेंकून देतें म्हणजे मला खात्रीनं मुलगा होईल. अंजिऱ्या, गाढवा, या टेबलावर ही स्त्री-लिंगी डिक्शनरी कशाला ? फेंक ही पलीकडच्या गटारांत.

**अंजिऱ्या**:—हं हं बाईसाहेब–डिक्शनरी काय फेंकतां ?

**इंदिरा**:—पोपई, सटवे इथं ही स्त्रीलिंगी केरसुणी कशाला ठेवलीस ? फेंक ही पलीकडच्या गटारांत, नि तो नवा पुल्लिंगी खराटा आणून ठेव इथं—नीघ चल. बाई, बाई, बाई, उच्छेद आणला बाई या मेल्यांनी. मेल्यांनो मला मुलगी व्हावी असं कां तुम्हाला वाटतं ? या स्त्रीलिंगी जिनसा घरांत राहूं दिल्यानं मला मुलगी व्हायची. उचलता कां नाहीं या स्त्रीलिंगी जिनसा.

अं. १ प्र. शेवटचा



बंडोबा वसंतराव

पोपई, ही खुर्ची उचल, ही लेखणी, ही दौत, ही तसबीर, ही आरशी, ही फौंटनपेन, ही घंटा, उचलतेस कीं घालूं टाळक्यांत ?

**पोपईः**—बाई, बाई, बाई, मला कांहीं हें स्त्रीलिंग पुल्लिंग समजत नाहीं बाई.

**इंदिराः**—म्हणजे ? एवढी घोडी वाढली आहेस आणि अजून तुला स्त्रीलिंग पुल्लिंग समजत नाहीं म्हणजे काय ? शाळेंत तुला मास्तरांनीं लिंगविचाराचा धडा शिकवला नाहीं वाटतं ?

**पोपई**—नाहीं. मी शाळेंतच जात नव्हतें.

**अंजिन्याः**—छान केलंस. शाळा स्त्रीलिंगा आहे. तूं शाळेंत गेली असतीस तर तुला सुद्धां मुलगी झाली असती. बाईसाहेब आतां ही पोपई माझी बायको होणार आहे. मी शिकवीन हिला सारा व्याकरणविचार.

**इंदिराः**—ही सुरी फेंकून चाकू आणून ठेव कागद फाडायला.

**अंजिन्याः**—फेकतों–आणतों.

**इंदिराः**—कायेर तिकडची स्वारी अजून कशी आली नाहीं !

**अंजिन्याः**—स्वारी कशी येईल बाईसाहेब ? स्वारी स्त्रीलिंगी आहे. वसंतरावांची स्वारी जर घरांत आली तर तुम्हाला सुद्धां मुलगी होईल ? त्यांचा अवतार लवकरच होईल बाईसाहेब.

**इंदिराः**—आणि आतां घरांतली स्त्रीलिंगी चाकर माणसं सुद्धां हाकलून दे बाहेर–ही पोपई कशाला माझ्यासमोर सारखी मिरवते आह. पोपई नीघ माझ्या समोरून नाहींतर मला मुलगी होईलना ?

**अंजिन्याः**—पण बाईसाहेब, पोपई अजून कुवारीच आहे. तुम्हीच म्हणत होतां कीं कुवारी आणि फक्त मुलगा झालेल्याच बायका माझ्या भेटीला आंत सोडीत जा म्हणून ?

**इंदिराः**—तर मग पोपईला खुशाल वावरूं दे घरांत. पोपई–ही बाज इथं कशाला ? उचल ही गादी, ही उशी, ही गिरदी, झाडून साऱ्या स्त्रीलिंगी जिनसा घरांत खेचाखेच भरून मला मुलगी व्हावी असं कां तुम्हाला वाटतं ? फेंक ही उशी.

( स्वतः उचलून फेंकते—वसंतराव येतो. )

**वसंतरावः**—लाडके–लाडके हें काय ? अग अशी तूं काय करतेस ? तुला वेड तर नाहीं लागलं ?

**इंदिराः**—मला आणि वेड–अहो तुम्हाला समजत नाहीं कां मला काय झालं आहे तें ?

**वसंतरावः**—छे कांहींच नाहीं उमगत.

**इंदिराः**—मी आजपासून लुगडीं नेसणार नाहीं.

**वसंतरावः**—नको नेसूस विजार नेस.

**इंदिराः**—( वेडावून ) म्हणे विजार नेस, बायका का कुठं विजार नेसतात ? अहो मला आतां पुल्लिंगी शालू आणून द्या नेसायला.

**पोपईः**—अंजिऱ्या मलासुद्धां पुल्लिंगी बांड आणून दे नेसायला.

**अंजिऱ्याः**—आणतों येत्या पगाराला.

**वसंतरावः**—आणीन. तुम्हां दोघींना शालू आणि बांड मी आणून देईन. पण लाडके हे काय अस्ताव्यस्त जिन्नस फेंकलेस ?

**इंदिराः**—नाहींच बाई लक्षांत यायचं अजून–अगदींच कसंहो तुमचं डोकं इतकं मठ्ठ ? हो पण तुम्ही आधीं डोक्यावरची स्त्रीलिंगी टोपी काढा, आणि मिशी काढून टाका, व पुल्लिंगी फेटा बांधून माझ्यासमोर या. छडी फेंकून हातांत सोटा घ्या. पायांत या वहाणा कशाला ? अहो या स्त्रीलिंगी जिनसांनीं मुलगी व्हायची. द्या फेंकून त्या वहाणा. पंपशू घालून या.

**अंजिऱ्याः**—अन् बाईसाहेब, यांची ही शेंडी कापून नुसता घेरा ठेवायला सांगा. नाहींतर ही शेंडी घरभर थैमान घालून तुम्हाला मुलगी व्हायची. ( स्व० ) पण यदाकदाचित् रावसाहेबांची शेंडी कापायचीच ठरलं तर कात्रीनं कापावी कीं चाकूनं ? आला, पुल्लिंगी डॉ. पेननाईफ आला.

**डॉ. पेननाईफः**—गुड मॉर्निंग वसंतराव.

**अंजिऱ्याः**—अहो डॉक्टर, मॉर्निंग स्त्रीलिंगी आहे गुड डे म्हणा.

**डॉ. पेननाईफः**—काय होतंय बाईसाहेबांना ?

**वसंतरावः**—तुम्हींच नाडी पाहून सांगा.

**अंजिऱ्याः**—नाडी ? स्त्रीलिंगी नाडी आतां कुठं शिल्लक आहे बाईसाहेबांजवळ ?

**वसंतरावः**—अंजिऱ्या चुप बस. बरं हात पहा.

**अंजिऱ्याः**—बरं बुवा चुप बसतों.

**डॉ. पेननाईफः**—बाईसाहेब हात द्या पाहूं इकडे.

**अंजिऱ्याः**—हं हात पहा.

**डॉ. पेननाईफः**—वसंतराव मिठाई काढा–मिठाई.

**अंजिऱ्या:**—मिठाई—पुल्लिंगी डॉक्टराला स्त्रीलिंगी मिठाई? मिळणार नाहीं. पेढा मागा, रसगुल्ला मागा, मिळेल.

**वसंतराव:**—पण झालं तरी आहे काय?

**डॉ. पेननाईफ:**—बाईसाहेबांना काय झालं आहे तें बाईसाहेब स्वतःच सांगतील. बरं येतों मी आतां.

**वसंतराव:**—म्हणजे? काय ग? काय झालं आहे तुला?

**इंदिरा:**—ओळखा पाहूं मला काय झालं आहे तें?

**छुरी:**—डॉ० पेननाईफ आले होते कां?

**इंदिरा:**—आले होते, पण तूं कशाला आलीस? अंजिऱ्या आधीं या स्त्रीलिंगी डॉक्टरणीला घराबाहेर काढ.

**छुरी:**—मी बाईसाहेबांची प्रकृती पहायला आलें आहे.

**अंजिऱ्या:**—अग, स्त्रीलिंगी प्रकृती बाईसाहेबांकडे शिल्लक नाहीं. चल जा.

**छुरी:**—बरं बाई जातें. (जाते)

**इंदिरा:**—बरं झालं गेली. हिचें कांहीं काम नाहीं. आणि हें बघा मी आतां अंगांत चोळी नाहीं घालणार तर ब्लाऊज घालत जाईन. हातांत नुसते गोट आणि बिलवर ठेवीन, सरी काढून गळयांत नुसता चंद्रहार, खायला सुद्धां भाज्या म्हटलं, चुका, चाकवत, भोपळा आणि मुळा आणला पाहिजे. आतां मी बाज्याची पेटी नाहीं वाजविणार. तंबोरा वाजवीन. कथेला न जातां सिनेमाला जाईन. आणि मोटारींत न बसतां टांग्यांत बसेन. चहांत म्हटलं साखर नाहीं घालूं देणार. पुल्लिंगी गूळ घातला पाहिजे नाहींतर मुलगी व्हायची!

**वसंतराव:**—म्हणजे तुला झालं आहे तरी काय आज?

**इंदिरा:**—दिसत नाहीं कां मला काय झालं आहे तें? ओळखा—नाहींना ओळखत? अहो—(कानांत सांगते.)

**वसंतराव:**—काय? दिवस राहिले आहेत म्हणतेस?

**अंजिऱ्या:**—त्यांना दिवसच राहिले आहेत. (स्व.) रात्र नाहीं राहिली. रात्र राहिली असेल तर मुलगी होईल.

**वसंतराव:**—नाहीं मला वाटतं तुला दिवस राहिले नसून एकादी हडळ झोंबली असेल!

**पोपई:**—छे, छे, रावसाहेब, बाईसाहेबांना स्त्रीलिंगी हडळ कशाला येऊन झोंबेल? त्यांना म्हटलं मुंजा झोंबला असेल.

**इंदिरा**:—अहो हिचं काय ऐकतां. आतां मला लवकरच मुलगा खात्रीनं होणार.

**अंजिऱ्या**:—बाईसाहेबांना मुलगा झाला कीं, त्याला मी माझ्या कडेवर घेऊन असा नाचवीन.

**इंदिरा**:—पण माझ्या बाळाला मी नाहीं तुला स्त्रीलिंगी कमरेवर घेऊं देणार त्याला तूं खांद्यावर घेणार असशील तर घेऊं देईन.

**अंजिऱ्या**:—हो हो तुमच्या मुलाला मी माझ्या पुल्लिंगी खांद्यावरच घेईन.

**वसंतराव**:—वा ! वा ! तुला दिवस राहिले अं. आतां माझ्या आनंदाला पारावारच नाहीं. आतां मला निपुत्रिक म्हणणाऱ्यांचे चांगलेच दांत पाडीन.

**अंजिऱ्या**:—दांत पाडूं नका. पाडायचीच असेल तर बत्तिशी पाडा.

**वसंतराव**:—अंजिऱ्या, अंजिऱ्या, मला यावेळीं कीं नाहीं हर्षवायू होत आहे.

**अंजिऱ्या**:—होऊं द्या. होऊं द्या. हर्षवायू झाला तर बाईसाहेबांना मुलगाच होईल. तो पुल्लिंगी आहे.

**वसंतराव**:—अंजिऱ्या मला यावेळीं आनंद, परमानंद, ब्रह्मानंद होत आहे.

**अंजिऱ्या**:—होऊं द्या. हे सर्व आनंद पुल्लिंगी आहेत.

**वसंतराव**:—मी तर ह्यावेळीं पृथ्वीवर आहे कीं स्वर्गात आहे हेंच मला कळत नाहीं.

**अंजिऱ्या**:—आपण स्त्रीलिंगी पृथ्वीवर असणं शक्य नाहीं. पुल्लिंगी स्वर्गात आहांत.

**वसंतराव**:—अहाहा ! आतां मला मुलगा खात्रीनं होणार.

**इंदिरा**—आणि मलाही मुलगा खात्रीनं होणार.

**वसंतराव**:—आणि मला निपुत्रिक म्हणणाऱ्यांच्या नाकांत मिरच्या भरून देणार.

**अंजिऱ्या**:—खुशाल भरून द्या. कारण मिरच्या स्त्रीलिंगी आहेत. त्या आपल्याला वाड्यांत ठेवावयाच्या नाहींत. तुम्हांला नावं ठेवणारांच्या नाकांत खुशाल भरून द्या.

**वसंतराव**:—अंजिऱ्या—तूं व पोपई दोघेजण गांवभर हिंडून गांवांत असं जाहीर करा कीं वसंतरावांना आतां मुलगा खात्रीनं होणार. आतां कांहीं ते निपुत्रिक मरत नाहींत आणि नरकांतही पण जात नाहींत. म्हणजे मला नांव ठेवणारांची नाकं चांगलींच ठेचलीं जातील.

**अंजिऱ्याः**—ठीक आहे चल पोपई–चल- चल. ( दोघे जातात. )

**इंदिराः**—म्हटलं आतां पावला कीं नाहीं मला माझा बाळकृष्ण ?

**वसंतरावः**—पावला तुझा बाळकृष्ण तुला खरोखर पावला. आतां देवीची पूजा बंद करून लामण दिवा लाव, उदबत्ती बंद करून नुसता कापूर जाळीत जा. आणि देवा पुढची घंटा बंद करून शंख वाजवीत जा. अग पण हो–सारच मुसळ केरांत–ही डोक्यावर स्त्रीलिंगी वेणी कशी ठेवलीस. काढ–काढ ती वेणी.

**इंदिराः**—अगबाई मी कशी विसरलें ? पण म्हातारपणीं तरी हें सुख माझे नशीबी होतंच–अं. !

**वसंतरावः**—अग पण आपण म्हातारे आहोंत कुठं ? तरूणपणचे सुखसोहाळे जर आपल्या नशिबीं प्राप्त झाले तर आपण तरुणच नाहीं तर काय ?

**इंदिराः**—खरंच गडे.

**वसंतरावः**—लाडके, आतां एकदां पोटभर हांस पाहूं. अगदीं पोटभर हंस !

---

## प्रवेश ७ वा

( रस्ता )

**अंजिऱ्याः—आनंदी आनंद गडे । जिकडे तिकडे चोहींकडे ।**
**मालक आमचे फार वडे । मालकिण त्यांना आवडे ।**
**मुलासाठीं मालक वेडे । आतां मिळतिल मज पेढे ॥**

मौज ! मौज ! ! खूप मौज, अशी मौज उभ्या जन्मांत या अंजिऱ्याला पाहायला मिळाली नव्हती. ( जाऊं लागतो—शास्त्रीबुवा येतात त्यांना धक्का लागतो. )

**नवग्रहः**—कायरे ए गध्या, माझ्याशीं टक्कर खेळतोस कां ? घालूं का काठी पाठींत !

**अंजिऱ्याः**—हं हं ! ! स्त्रीलिंगी टक्कर कशी खेळतात तें मला काय ठाऊक ? हं सामना खेळेन. अन त्याबद्दल पाठींत सोटा मारा हवा तर.

**नवग्रहः**—अरे अंजिऱ्या, हें रे काय आज नवीन आरंभलं आहेस. ?

**अंजिऱ्याः**—मी काय आरंभलं आहे ? बाईसाहेबानींच घडा घालून दिला आहे. आता तुमची देवीची पूजा बंद झाली बरं कां ! बाळकृष्णावर सारखा

अभिषेक सुरू होऊन, देवघरांत समई ऐवजीं लामणदिवा तेवत असून नैवेद्याला साखरे ऐवजीं गूळ मिळत जाईल गूळ. फुलवातीला रजा मिळून नुसता कापूर जळत असतो. घंटेची जागा पुल्लिंगी तासानं पटकावली आहे.

**नवग्रहः**—अरे पण या स्त्रीलिंगी जिनसांना रजा काय म्हणून दिली ?

**अंजिऱ्याः**—अहो रजा या शब्दाला सुद्धां रजा मिळाली आहे. रजा न म्हणतां पुल्लिंगी अर्धचंद्र म्हणा.

**नवग्रहः**—म्हणजे बाईसाहेबांना वेड लागलं आहे. तें याचंच कीं काय ? अरे त्याचं वेड जावं म्हणून मी ही मंतरलेली रक्षा आणली आहे.

**अंजिऱ्याः**—रक्षा ? कशाला आणलीत ? स्त्रीलिंगी रक्षा मुळींच खाणार नाहींत बाईसाहेब. अंगारा कां नाहीं आणलात मंत्रून ? त्यांना रक्षा दिलीत तर मुलगी होईल. आधी परत जा आणि आणा अंगारा मंत्रून. तसंच ही स्त्रीलिंगी शाल घरीं ठेऊन या. या खडावा, ही पळीपंचपात्री अरे बापरे या तर सर्व स्त्रीलिंगी जिन्नसा, अशानं तुम्हांला वाडयांत मज्जाव होईल. अहो बाईसाहेबांना मुलगा व्हावा असं नाहीं का तुम्हांला वाटत ?

**नवग्रहः**—म्हणजे बाईसाहेबांना दिवस राहिले आहेत वाटतं ?

**अंजिऱ्याः**—नाहीं तर काय ? रात्र राहणार आहे वाटतं ? त्यांना पुल्लिंगी दिवस राहिले आहेत आणि लवकरच मुलगाही पण होईल.

**नवग्रहः**—तर मग मला आधीं वाडयांत जाऊन बाईसाहेबांकडून बक्षिशी उपटली पाहिजे.

**अंजिऱ्याः**—बक्षिशी मिळणार नाहीं.

**नवग्रहः**—कां बरं, बाईसाहेबांना मुलगाच होणार हें भविष्य मी वर्तवलं आहे.

**अंजिऱ्याः**—असेल पण स्त्रीलिंगी बक्षिशी बाईसाहेब मुळींच देणार नाहींत. त्याऱ्याजवळ नजराणा मागा, सल्ला मागा, विल्ला मागा, रसगुल्ला मागा, मिळेल.

**नवग्रहः**—अरे ! अरे !! कायरे हा पुल्लिंगांचा हल्ला ?

### पद

**ही कसली बाधा-अवचिता-सहसा कळेना घर भारियलें ॥ ध्रु० ॥**
**हर्षें डुलती तुमच्या माना, रमतां मौजे तुम्ही राघु मैना ॥ १ ॥**

अंजिऱ्या तूं तर या व्याकरणविचारांत बराच विशारद झालेला दिसतोस. मी नवग्रह शास्त्री आणि तूं व्याकरण शास्त्री जमली जोडी.

अंजिऱ्याः—अं–जोडी ? अहं. जोडा म्हणा. मारा हातावर हात नाहींतर स्त्री-लिंगी घे टाळी म्हणाल. पण हे पहा शास्त्रीबुवा, आता ही पळी पंचपात्री, या खडावा, ही शाल माझ्याकडे द्या आणि मग वाड्यांत जा.

नवग्रहः—ठीक आहे. आतां प्रथम वाड्यांत जाऊन कॉफी पिऊन मग बाई-साहेबांची भेट घेईन.

अंजिऱ्याः—कॉफी–अहं, आतां कॉफी बंद. चहा मिळेल चहा, आणि तो सुद्धां स्त्रीलिंगी बशीनं न पितां कपानंच प्यावा लागेल. आणि स्त्रीलिंगी जिभेला न लावतां घशांत सोडावा लागेल.

नवग्रहः—अरे पण अंजिऱ्या तूं तर माझ्यावरही कडी केलीस.

अंजिऱ्याः—अहं कडी नाहीं कोयंडा म्हणा. ( शास्त्रीबुवा जातात.) बस आतां मी व्याकरणशास्त्री तर बनलों. आतां पोपई भेटली कीं तिला ही शालजोडी देवून वर लिंगविचाराचे पाठ देईन म्हणजे झालं. अरे वा ! आलीच कीं माझी मनहरणी शिकारी सुंदरी.

पोपईः—अग बाई हा तर अंजिऱ्या आणि शास्त्र्याच्या वेषांत कसा ? कायरे ए अंजिऱ्या–हें रे काय सोंग ?

अंजिऱ्याः—हे सारं सोंग तुझ्याकरतांच बरं ?

पोपईः—म्हणजे माझ्याकरतां कां हें सोंग घेतलंस ?

अंजिऱ्याः—हो तर, बाईसाहेबांना मुलगा व्हावा म्हणून तर नवग्रहशास्त्र्या-जवळून या स्त्रीलिंगी जिनसा काढून घेतल्या. बाईसाहेबांना मुलगा होऊन तुझं माझ्याबरोबर लग्न लागलं कीं ही शालजोडी—

“ घालीन शाल ही भरजरीची तुजवरी ”

## पद

**झालों झालों पहा मी लिंगविशारद मोठा । मला उमजे स्त्रीलिंग मला समजे पुल्लिंग ।**

**पोपईः—मोठा आलास टिपूंजी वेटा ॥ १ ॥**

**अंजिऱ्याः—लिंग विचाराचा पाठ तुला द्यावया हा थांब ।**

**पोपईः—मोठा केलास परी तूं खोटा ॥ २ ॥**

**अंजिऱ्याः—तो ज्योतिषशास्त्री मी व्याकरणशास्त्री ।**

**पोपईः—तुझा पाड काय तूं दिवटा ॥ ३ ॥**

**अंजिऱ्याः**—तुला आणिन शरण धर माझे चरण।
**पोपईः**—कां पाहिजे का पाठींत सोठा ॥ ४ ॥

**पोपईः**—देव करो नि बाईसाहेबांना मुलगीच होवो.

**पिलोबाः**—( एकीकडे ) ऐकलं. बाईसाहेबांना मुलगी होईल असं हिचं म्हणणं आहे. हें जर खरं झालं तर पोपई या पिलोबाची. ( जातो. )

**अंजिऱ्याः**—मुलगी नाहीं होणार मुलगाच होणार. शास्त्रीबुवांचं भविष्य आणि बाईसाहेबांचे डोहाळे मुलगाच होईल असं सिद्ध करतात. हो बरी आठवण झाली. बाईसाहेबांसमोर तुला व्याकरणविचाराचे पाठ देईन असं म्हटलं होतं. देऊं का ? बोल. तुला व्याकरणविचारांत अगदीं तरबेज करून सोडतों. आहे तयारी ? म्हणजे बाईसाहेबांच्या समोर तूं व्याकरणशुद्ध बोलूं लागशील.

**पोपईः**—पण स्त्रीलिंग व पुल्लिंग यांत श्रेष्ठ लिंग कोणतं ?

**अंजिऱ्याः**—दोहोंना महत्त्व सारखंच. अग पुरुष आणि स्त्री ही दोन्ही संसार–गाड्याची चाकं आहेत. दोघांचे हक्क अगदीं समसमान आहेत. एकाचं दुसऱ्या वांचून अडतं यावरूनच पहा दोघांनाही महत्त्व सारखंच आहे कीं नाहीं.

**पोपईः**—नाहीं. स्त्री लिंग श्रेष्ठ असंच मला वाटतं ?

**अंजिऱ्याः**—छे छे, केव्हांही नाहीं, तसं असतं तर तुझा हा स्त्रीलिंगी देहच पहाना–तुझ्या देहाच्या शिरोभागीं तर पुल्लिंगी केस फडकताहेत, हे तुझे नेत्र तुझ्या पुल्लिंगी मुखचंद्राला कितीतरी शोभा देत आहेत. हे तुझे ओठ, हे तुझे गाल, हा गळा, हा खांदा, हे तुझे पुल्लिंगी हात मला कडकडून भेटायला सरसावून पहात आहेत.

**पोपईः**—हे काय माझ्या स्त्रीलिंगी देहावर इतके का पुल्लिंगी पदार्थ वावरत आहेत ? अगबाई.

**अंजिऱ्याः**—अग म्हणून तर बायकांवर पुरुषांचं वर्चस्व असतं, हा बघ तुझ्या उरांत प्रेमाचा उमाळा उद्भवलेला स्पष्ट दिसतो आहे.

**पोपईः**—अगबाई खरंच, मी परस्वाधीन होत चाललें.

**अंजिऱ्या**—अग तुझ्या या स्त्रीलिंगी देहाच्या ठायीं हे सारे पदार्थ इतकं थैमान घालताहेत कीं हे तुझे पाय माझ्या जवळ येऊन राहण्यासाठीं धडपडताहेत. तरी सुंदरी आतां उगीचच कां माझा अंत पहातेस, एकदम ये आणि कडकडून भेट पाहूं ?

अं. २ प्र. १




पिलोबा बाळूबाई

**पोपई:**—वा, वा, पैजेचा निकाल लागल्याशिवाय मी नाहीं तुझ्या पकडींत यायची—अगबाई—पदर कसा दूर गेला ?

**अंजिन्या:**—बघ तुझंच उदाहरण घे. हा तूं पदर सावरलास. अग स्त्रीलिंगी लाज झाकण्यासाठीं तुला पदराचाच आश्रय घ्यावा लागला ना ?

**पोपई:**—होय गडे.

**अंजिन्या:**—मग पैज बाजूला ठेवून झटपट माझी हो कशी !

**पोपई:**—खरंच बाई या जगांत पुरुषाला जास्त श्रेष्ठत्व आहेस दिसतं, पण पैजेचा निकाल झाल्याशिवाय मी नाहीं गडे लग्न करणार.

**अंजिन्या:**—राहिलं, कबूल, पैजेचा निकाल होऊं दे. मग मात्र आढेवेढे घेतां कामा नये. ही शाल घे तुला त्या बद्दल.

---

## प्रवेश ८ वा

( दिवाणखाना. )

**इंदिरा:**—आतां माझ्या मनासारखं झालं. माझ्याभोंवताली सारा पुरुषी पदार्थांचा सरंजाम थाटून दिल्यामुळं मला खरोखरीच पुरुषी पदार्थांचे डोहाळे लागूं लागले आहेत. म्हटलं मला आतां मुलगाच होणार !

**वसंतराव:**—होणारच, तुला मुलगाच होणार. पण लाडके मुलाचं नांव तरी काय ठेवणार ? आत्तांपासून ठरवलेलं बरं नाहीं कां ? असं सुंदर नांव शोधून काढतेस कीं यंव—

**इंदिरा:**—मग " सुंदर " हेंच त्याचं नांव ठेवा म्हणजे झालं.

**वसंतराव:**—ठीक–अगदीं पसंत. पण नवग्रह शास्त्र्याचं भविष्य मात्र पक्कं पाहिजे. नाहींतर फटकन् मुलगी होऊन इस्टेट मोहनच्या घरांत जायची.

**इंदिरा:**—पण मोहन आपला कोणीही नाहीं असा लेख मोहननं रजिस्टर करून दिला आहेना ?

**वसंतराव:**—तरी पण इस्टेट त्याला दान केल्याचा लेख बंडोबाजवळ असल्यानं मला अजून धास्ती वाटते. शिवाय फार दिवसांनीं दिवस राहिले म्हणजे मुलगी होते, असं बरेचजण म्हणतात. मोहन आपला पुतण्याच आहे असं बंडोबा म्हणतो तें जर खरं ठरलं तर सगळंच मुसळ केरांत. तेव्हां म्हणतों शास्त्रीबुवांचं भविष्य खरं ठरलं पाहिजे.

**इंदिरा**:—मला मुलगा व्हावा म्हणून मी देवावर संकट सुद्धां घालून ठेवलं आहे. साऱ्या देवतांना काल पासून मी पाण्यांत बुडवून ठेवलं आहे. देव देवतांचा शोध करीत असतील पण त्या कांहीं त्यांना सांपडणार नाहींत. मला मुलगा झाला कीं त्या देवतांना मी फिरून देवांच्या स्वाधीन करीन. असं देवावर संकट घातल्याशिवाय ते कुठले प्रसन्न व्हायला ?

**वसंतराव**:—फार छान केलंस! मी सुद्धां मुलगा व्हावा म्हणून काय कमी प्रयत्न केले आहेत. एक. आपल्या चकमक मोहल्याचं नांव मुलगा मोहोल्ला असं ठेवण्याबद्दल मी म्युनिसिपालटीच्या अध्यक्षाकडे दरखास्त दिली आहे. शिवाय तूं बाळंत होऊन मुलगा होईल त्याच दिवशीं आपल्या गांवांतील अॅमेच्युअर क्लबकडून "हाच मुलाचा बाप" ह्या नाटकाचा मी आपल्या गांवांत प्रयोगही करणार आहे. या प्रयोगासाठीं नाटकांच्या तालमीसुद्धां कालपासून सुरू केल्या आहेत. त्या नाटकांतील मुलाच्या बापाचं नांव "वसंतराव" असं ठेवण्याविषयीं सांगून सुद्धां ठेवलं आहे. अशी योजना केल्यावर देव मला मुलगा देणार नाहीं, असं होईल तरी कसं? देवाला मला मुलगा द्यावाच लागेल.

**नवग्रह**:—(येतात) मी तर म्हणतों तुम्हांला पहिला मुलगाच होणार. रावसाहेब आपल्या या मोहल्याला आजच्या सभेंत म्युनिसिपालिटीच्या अध्यक्षाकडून मुलगा मोहल्ला हें नांव दिलं गेलं हें कळलं का आपल्याला. नसेल तर तो दवंडीवाला काय ओरडतो तें कान देऊन ऐका.

[(पडद्यांत दवंडी) ऐका हो ऐका. समस्त लोक हो ऐका चकमक मोहल्यांतील प्रसिद्ध सावकार रावसाहेब वसंतराव चुरमुरे यांना मुलगा व्हावा म्हणून आजपासून चकमक मोहल्याचं नांव 'मुलगा मोहल्ला' असं ठेवण्यांत आलं आहे हो.]

**वसंतराव**:—पाहिलंस–देवावर असं संकट घातल्याशिवाय देव आपल्याला मुलगा देणार नाहीं.

**इंदिरा**:—आतां बाई माझ्या अगदीं मनासारखं होत आहे.

**नवग्रह**:—तर हो, त्या दिवशीं त्या बंड्यानं–त्या डांबिसानं–केवढं संकट आणलं होतं पण आपलं त्या गोपालकृष्णानं निभावलं.

**पिलोबा**:—(येऊन) रावसाहेब, सांगितल्याप्रमाणं सर्व कामं पार पाडलीं. आपल्याला मुलगा होणार, तेव्हां तो मोठा झाल्यावर त्याला शिक्षण देण्या-

साठीं हुषार मास्तर वेळेवर मोकळा सापडणार नाहीं म्हणून मी त्या हनुमान मास्तरला आपल्या बाळाची शिकवणी ठरवून टाकली. त्याचा १० रु. दरमहा कालपासून सुरू सुद्धां केला.

**इंदिराः**—छान झालं आतां मला खात्रीनं मुलगा होणार. पिलोबा मुलाच नांव " सुंदर " असं ठेवण्यांत येणार आहे हें त्या हनुमान मास्तराला कळवून ठेवा.

**पिलोबाः**—ठीक आहे कळवतों. " सुंदर वसंत " हें मुलाचं नाव मास्तरला कळवून ठेवतों.

**वसंतः**—पिलोबा आणखी कोणती कामगिरी बजावलीस ?

**पिलोबाः**—" सुंदर वसंत " जन्मास आल्यावर त्यांच्या आंगचे कपडे आयत्या-वेळीं, तयार करून द्यायला चांगल्या शिंप्याला फुरसत सांपडणार नाहीं, म्हणून त्यांचे कपडे–सूट, अंगडीं, टोपडी त्या मुंबईहून शिकून आलेल्या शिंप्याला ऑर्डरसुद्धां दिली.

**नवग्रहः**—वा, वा– फार छान.

**वसंतरावः**—उत्तम–मुलगा होण्याची तयारी पूर्ण करण्याकरितां, पिलोबा, " सुंदरवसंत " यांच्या नांवानं बालमित्र, आनंद, मुलांचं मासिक सुद्धां व्हीं. पी. नें बोलव–समजलं ? म्हणजे त्याचं नांव मासिकांचे कचेरींत, सार्ट-रच्या डब्यांत, पोष्टाच्या खोलींत नी आपल्या या आलमटोल्यांत महशूर होईल व देवाला मला मुलगा द्यावाच लागेल.

**पिलोबाः**—ठीक आहे, त्याचं नांव सुद्धां प्रायमरी शाळेंत दर्ज करून टाकतों म्हणजे झालं.

**इंदिराः**—शिवाय, घरावर टांगलेली यांच्या नांवाची पाटी काढून त्या जागीं माझ्या लाडक्या सुंदरच्या नांवाचा बोर्ड टांगून ठेव.

**वसंतरावः**—पिलोबा ही सारी कामं झपाझप आटपून टाक, सिंगल किंवा डबल मार्च रोजीं ही बाळंत होईल. दिवस जवळ येत चालले. तसेंच माझ्या इष्टमित्रांची व नातेवाईकांची नावनिशीची यादी तयार करून ठेव. फक्त मुलगे झालेले मित्र व मुलगे झालेले नातेवाईक मुलाच्या बारशाच्या समा-रंभाला बोलवायचे आहेत. समजलास ?

**पिलोबाः**—ठीक आहे. हीं सारीं कामं प्रथम करून टाकतों.

**वसंतरावः**—शिवाय मला मुलगा व्हावा म्हणून माझ्या रहात्या घरांत तुम्ही साऱ्यांनीं आणि माझ्या चाकर माणसांनीं मुलगा-मुलगा असा प्रचंड जयघोष

करून हा माझा भव्य वाडा धरणीकंप झाल्याप्रमाणें हादरून सोडा. आजपासून फक्त मुलगा झालेल्या स्त्रीपुरुषांना माझ्या वाड्यांत येण्याची परवानगी दिली जाईल. इतरांना वाड्यांत येण्याचा मज्जाव केला जाईल हेही पण गांवभर जाहीर करा.

**नवग्रहः**—अरे ए पिलोबा थांब. आपल्या या गांवांत "अंधार" नांवाचं वर्तमान पत्र निघतं ना त्यांत जाहिरात देऊन टाक म्हणजे झालं.

**पिलोबाः**—फार उत्तम, आतां त्याच कामगिरीवर जातों. ( जातो. )

**इंदिराः**—शास्त्रीबुवा, अलीकडं रात्रीं मला कधीं कधीं चमत्कारिक स्वप्नं पडतात. डोळ्यांपुढें मधुकर भावजी उभे आहेत, असा भास पुष्कळ वेळां होतो. माझ्या पोटच्या पोराच्या नरडीला मधुकर भावजी नख लावीत आहेत असंही एक दोन वेळां मला स्वप्नांत दिसलं, पण मी विचार केला कीं स्वप्नं हीं खरीं नसतात. शिवाय स्वप्नांत मला मुलगा झालेला दिसला त्या आनंदामुळं मधुकर भावजींचा तो अक्राळ विक्राळ चेहरा पाहून सुद्धां मी घाबरलें नाहीं.

**वसंतरावः**—पण काय ग लाडके, मला नाहीं कुठं तूं हें स्वप्न सांगितलंस.

**नवग्रहः**—बाईसाहेब हीं स्वप्नं झूट आहेत. यावर विश्वास ठेवून भिऊन जाऊं नका. अशा परिस्थितींत तुमच्या मनांत भेकडपणा असतांच कामा नये. अहो नाहींतर भेकड मुलगा निपजायचा.

( बंडोबा बुरख्यासह येतो. )

**इंदिराः**—अगबाई हाच तो काळपुरुष ! अगबाई.

**वसंतरावः**—कोण ? कोण आहेस तूं ?

**नवग्रहः**—हा विचित्र काळपुरुष कोण असावा बरं. आणि हा इथं काळा बुरखा घेऊन कां आला बरं ? ह्याला आपलं तोंड दाखविण्याची लाज वाटते होय ? कायरे ए काळपुरुषा बाईसाहेबांना भेडसावणारा तूं कोण आहेस ?

**बंडोबाः**—मला पाहून मुळींच भिऊन जाऊं नका.

**इंदिराः**—अगबाई, स्वप्नांतल्या काळपुरुषाचा हाच आवाज होता बरं !

**वसंतरावः**—शास्त्रीबुवा याचा काळा बुरखा दूर करून हा कोण आहे तें पहा बरं ?

**नवग्रहः**—कायरे ए काळपुरुषा तूं कोण आहेस ? तुला आपलं काळं तोंड दाखविण्याची लाज वाटते होय ?

**इंदिराः**—याला पाहून मला घेरी येते. मला सावरून तरी धरा.

( पोपई येऊन सावरते. )

**पोपईः**—अग बाई, बाईसाहेबांना काय झालं !

**वसंतः**—अंजिऱ्या, ( अंजिऱ्या येतो ) ह्या काळ्या पुरुषाला गचांडी मारून काढून दे.

**अंजिऱ्याः**—गचांडी कशाला ? याला पुल्लिंगी ठोसा लगावतो. कायरे ए काळपुरुषा ? बाईसाहेबांना भेडसावणारा तूं कोण आहेस ?

**बंडोबाः**—माझा नी बाईसाहेबांचा निकटचा संबंध आहे.

**इंदिराः**—हाय ! हाय ! काय ऐकतें हें मी ? माझ्यावर आणि या वयांत असा नीच आरोप ?

**वसंतरावः**—अंजिऱ्या पाहतोस काय लगाव ठोसा.

**बंडोबाः**—खबरदार ( बुरखा सारून. )

**वसंतरावः**—कोण ? बंडोबा—नीचा तुला पुन्हां इथं काळ तोंड घेऊन यायला लाज नाहीं वाटत ? नीचा दुरात्म्या, माझ्या बायकोशीं तुझा काय संबंध आहे.

**नवग्रहः**—थांबा रावसाहेब. याचा बाईसाहेबांशी काय संबंध आहे हें मला कुंडली मांडून पाहिलंच पाहिजे.

**बंडोबाः**—मी कोण आहे हें पहायला कुंडली कशाला पाहिजे ?

**इंदिराः**—या मेल्याशीं बोलतां कशाला ? हा काळसर्प तुमच्या माझ्या जिवावर उठलेला आहे. याला धक्के मारून घराबाहेर घालवून द्या.

**पोपईः**—कीं त्या कोपऱ्यांतल्या खराट्यानं घेऊं का मेल्याचा समाचार ?

**अंजिऱ्याः**—तूं कशाला श्रम घेतेस ? माझे हात कांहीं केळीं खायला गेले नाहींत. अशी एक श्रीमुखांत भडकवतों—

**बंडोबाः**—( पिस्तुल दा० ) खबरदार-हा बंडोबा कोण आहे तें या हातावर पहा. वाचा ही गोंदलेलीं अक्षरं—

**वसंतरावः**—कोण मधुकर चुरमुरे–हाय–हाय–माझा सावत्र भाऊ !

**इंदिराः**—अगबाई–भावजी ?

**बंडोबाः**——बऱ्या बोलानं मोहनला दत्तक घेतां कीं प्राणास——( पिस्तुल रोखतो. )

( अंजिऱ्या पिस्तुल काढून घेऊन पाडतो. )

**अंजिऱ्याः**——पाजी माणसा तूं रावसाहेबांचा भाऊ असलास तरी यावेळीं खूनी आहेस. आम्हां सर्वांना तूं स्त्रैण भागूबाई समजलास काय ?

**वसंतरावः**——मधुकर इथून काळं करतोस कीं प्राणास मुकतोस ?

**बंडोबाः**——प्राणास मुकण्यापूर्वीं तुला मुलगी होईल हा माझा कडक शाप नीट ऐकून घे.

**अंजिऱ्याः**——दुरात्म्या, मुलगा होईल असं म्हटलंस तरच तुझे प्राण तुला मिळतील.

**वसंतरावः**——अरे पाहतोस काय ? त्याची ठिकरी उडव.

**अंजिऱ्याः**——ठिकरी कशाला याचा पुल्लिंगी मुडदाच पाडतो. शरण येऊन मुलगा होण्याचा आशिर्वाद देतोस कीं घेऊं प्राण ?

**नवग्रहः**——बोल मुलगा होणार कीं मुलगी ?

**बंडोबाः**——मुलगा——मुलगा——मुलगा.

( पडदा पडतो. )

# अंक दुसरा

## प्रवेश १ ला

पोपई:—

### पद

**हास हास मला मोहे मनाला या मनाला। सौख्य वचनें हा डोलवी जिवाला या मनाला । धृ० । करीन सुमन झोला बसवुनि वरि त्याला । सौख्य वचनें हा डोलवी मनाला या मनाला ॥ १ ॥**

देव करो आणि बाईसाहेबांना मुलगाच होवो. मी जरी मुलगी होईल अशी अंजिऱ्याशीं पैज मारली असली तरी त्याची अक्कल हुषारी पाहून माझं मन त्याच्याकडेच धांव घेत आहे, माझी पैज खोटी ठरो आणि बाईसाहेबांना मुलगाच होवो.

**पिलोबा:**—( प्र. करून ) हिची पैज खरी ठरून बाईसाहेबांना मुलगीच होवो.

**पोपई:**—पिलोबा असं अभद्र काय बोलतां ?

**पिलोबा:**—अभद्र ? अग मुलगी होवो म्हणून आशिर्वाद दिला यांत अभद्र काय बोललों ? तूं पैजेवर सांगितलं आहेस नां कीं बाईसाहेबांना मुलगी होईल म्हणून ? तुझी पैज खरी व्हावी म्हणून तर मी तसं बोललों. मुलगी झाली म्हणून काय झालं ? मला नाहीं का एक सोडून तीन मुली झाल्या ?

**पोपई:**—म्हणजे तुमचं लग्न झालं आहे वाटतं ?

**पिलोबा:**—( स्व. ) अर्र्र् कसा मी चुकलों ? आतां कसची ही शिकारी सुंदरी मला माळ घालणार ? ( उघड ) नाहीं, नाहीं, मी कांहीं तरी स्वप्नांत बरळलों. अग मला बायको नाहीं, माझं लग्न झालेलं नाहीं, मला तीन मुलीही पण नाहींत, समजलीस ? नाहींतर मुलीच मुली झालेल्या या पिलो-

बाला आत्तांच वाड्यांत येण्याजाण्याची बंदी व्हायची. पण पोपई बाईसाहेबांना मुलगीच होणार हें माझं भाकीत खरं होणार, आणि हीच तुझीही पण पैज आहे.

**पोपई:**—म्हणजे शेवटीं पैज मीच जिंकणार वाटतं ?

**पिलोबा:**—तूंच जिंकणार, पैजेंत यश मिळाल्यावर या दासाला घेशील ना पदरांत ? अग मी तुझ्यासाठीं ही खटपट चालविली आहे बरं ( भाजीचं गाठोडं दाखवून ) पाहिलेस ! हे सारे स्त्रीलिंगी पदार्थ ? हीं स्त्रीलिंगी फळं बाईसाहेबांना खायला दे म्हणजे त्यांना मुलगी होऊन तुझा माझा कार्यभाग साधेल. त्या अंजिन्यापेक्षां तुला मी हजार हिश्शांनीं आवडेन, मी काटकसरी आणि संसारदक्ष आहें. ही कानांतली " विडी " पहा. या विडीचा एक दम मारून ही पुन्हां विझवून कानावर ठेवतों. एकच विडी पण तिची तीन वेळां लज्जत घेतों, आतां ही पोपई आणि ही काकडी घेऊन जा वाड्यांत–

**पोपई:**—पिलोबा, हीं स्त्रीलिंगी फळं कशाला आणलींत ? बाईसाहेब कांहीं हीं फळं खाणार नाहींत. त्यांच्यासाठीं अननस, पपनस, फणस, ऊस आणायचा होता. पण मला आधीं खरं सांगा कीं तुमच्या मनांतून बाईसाहेबांना मुलगीच व्हावी असं आहे का ?

**पिलोबा:**—होय अगदीं अस्सं आहे आणि हें केवळ तुझ्या प्रीतीकरतां बरं.

**पोपई:**—( हसून ) कांहीं तरीच, माझ्या करतां कां, ही सारी खटपट ?

**पिलोबा:**—अग हो केवळ तुझ्या करतांच बरं.

**पोपई:**—( स्वगत ) काय मेला दुष्ट आहे हा. ज्याचं अन्न खातो त्याच्याच घराचे वासे मोजतो आहे. ( उघड ) बरं पिलोबा हीं फळं वाड्यांत नेऊं नका, बाईसाहेबांना मुलगी व्हावी म्हणून प्रयत्न जे करायचे ते असे उघड उघड करूं नका. अशानं गोत्यांत याल. हे प्रयत्न चोरून मारून करावे लागतील समजलांत ? ( स्वगत ) यावेळीं अंजिन्याकडून याला मुद्देमालासह पकडलेला बरा. ( जाते. )

**पिलोबा:**—पसंत. तुझी मसलत सोळा आणे पसंत ( फळं पिशवींत ठेऊन ) काय हो ही गोड पोरगी ! हिचे माझे विचार तंतोतंत जुळले. मला लागोपाठ तीन पोरी झाल्यामुळं मी बायकोला टाकून दिली–मुलींना पांजरपोळांत सोडलं हें कांहीं कुणाला ठाऊक नाहीं. आतां हीं फळं आपल्याच घरीं नेऊन टेवावी ( समोर बाळूबाईस पाहून ) आं ? ही कोण ?

**बाळुबाई:**—( येऊन स्वगत ) वर्तमान पत्रांतल्या जाहिराती प्रमाणं मी या आलमटोल्यांत तर आलें.

**पिलोबा:**—अहाहा ! किती मारू पाखरूं आहे हें !

**बाळुबाई:**—( स्वगत ) या मुलगा मोहल्यांत पिलोबा कारकुनाचं घर कुठं शोधावं ? या माणसाला विचारून तरी पहावं.

**पिलोबा:**—हिनं माझं नांव कसं घेतलं ? हिचं माझ्याकडच कांहीं काम आहे वाटतं—पहावं विचारून ( उघड ) कायहो—आपण कोण ? पिलोबा कारभाऱ्या विषयीं आपण काय पुटपुटलांत ?

**बाळुबाई:**—बरं विचारलांत, मीच तुम्हाला विचारणार होतें ?

**पिलोबा:**—विचारा–खुशाल विचारा. बायकांनीं निदान मला–पिलोबाला तरी कोणतीही गोष्ट विचारायला कांहींच हरकत नाहीं.

**बाळुबाई:**—म्हणजे वसंतरावांचे खासगी कारभारी म्हणतात ते तुम्हीच कां ?

**पिलोबा:**—होय–पिलोबा म्हणतात तो मीच. तुमचं माझ्याशीं कांहीं काम आहे वाटतं ?

**बाळुबाई:**—तुमच्याशींच काम आहे ( वर्तमानपत्र दाखवून ) या तुम्ही दिलेल्या जाहिराती प्रमाणें मी आलें आहे. मी मिडवाईफ बाळूबाई आहे.

**पिलोबा:**—असं–वा ! फार छान–तुम्ही मिडवाईफ बाळुबाई अं ?

**बाळुबाई:**—होय.

**पिलोबा:**—बाळुबाई–अहो बाळुबाई तुम्ही फारच सुंदर आहांत बुवा.

**बाळुबाई:**—(स्व.) अगबाई–हा माझ्या रुपावर भुललेला दिसतो. ही जाहिरात यानं अशाच घाणेरड्या कामासाठीं तर नाहीं ना दिलीन ! ( उघड ) हें पहा मी सुंदर असो वा नसो. पण मी वसंतरावांच्याकडे नोकरीसाठीं आलें आहे, होईल ना माझा अर्ज मंजूर ?

**पिलोबा:**—तुमचा अर्ज मंजूर करणं सर्वस्वी माझ्या हातांत आहे. पण काय हो तुमचं कपाळ असं कोऱ्या कागदासारखं पांढरं फटफटीत कसं ? त्यावर कुंकवाचा टिळा कसा नाहीं दिसत. चंद्रावर सुद्धां डाग आहे पण तुमचा मुखचंद्रमा डागाशिवाय फटफटीत कसा ?

**बाळुबाई:**—( रडत ) काय सांगू पिलोबा, इकडचे मला सोडून गेले आणि माझं हें असं झालं !

पिलोबाः—( हुंदके देत. ) आणि बाळुबाई-काय सांगु बाळुबाई इकडची माझी हीसुद्धां मला सोडून गेली आणि मी असा उघडा पडलों आहे ग !

बाळुबाईः—खरंच कां ? तर मग आपण समदुःखीच आहोंत म्हणायचं ? ( स्व. ) मेल्याचं हृदय तरी समजेल एकदाचं ?

पिलोबाः— होय ग बाळुबाई, तुला नाहीं नवरा नी मला नाहीं बायको—म्हणून म्हणतों—पण—

बाळुबाईः—पण काय ? मी म्हणतें एकदां वाड्याकडे चला नी घ्या मला रुजू करून नोकरीवर.

पिलोबाः—( स्व. ) हिला एकदम वाड्यांत नेणं ठीक नाहीं ( उघड ) पण बाळुबाई सारंच मुसळ केरांत कीं हो पडलं ! अहो आमच्या रावसाहेबांच्या वाड्यांत बायकांना तर मज्जाव आहे. त्यांतून फक्त कुंवारी व मुलगे झालेल्या स्त्रिया यांनाच वाड्यांत जाण्याची परवानगी आहे. तर बोला. तुम्ही कुवारी तर खास नाहीं. पण तुम्ही मुलीच्या आई आहांत का मुलाच्या ? मुलीच्या आई असाल तर वाड्यांत मज्जाव आहे. मुलाच्या असाल तर जा.

बाळुबाईः—अहो मला मुलगा असो किंवा नसो. पण मी जिथं जिथं म्हणून बाळंतपणाला जातें, तिथं तिथं सारे मुलगेच पैदा होतात. असा माझ्या हाताचा गूण आहे.

पिलोबाः—अहो तुमच्या हातानं होत असल हो पुल्लिंगी मुलगा पण तुम्हाला एकादा मुलगा झाला आहे कां ?

बाळुबाईः—नाहीं झाला म्हणून ? तुम्ही होणार आहांत वाटतं माझा मुलगा ?

पिलोबाः—घ्या—ऐका ? आतां मी म्हणे या बाईचा मुलगा ? तुम्हाला पटतं कां हें ? कायहो ! अहो हसतां काय ? जिच्या सौंदर्याला भुलून मी जिला बायको करण्याच्या विचारांत होतों ती माझी आई होऊं पहात आहे. कर्म माझं.

बाळुबाईः—( रडत ) काय सांगुं पिलोबा. मला एक मुलगी होती पण ती सुद्धां देवानं ठेवली नाहीं. ( रडूं लागते )

पिलोबाः—( पाटीवरून हात फिरवीत ) उगी—उगी, मिडवाईफ उगी, उगी, उगी. ( रडवा चेहरा करून ) अग रडूं नको ? ( अंजिऱ्या, पोपई येतात. )

अंजिऱ्याः—काय ग पोपई—हें काय ग कंत्राट ?

**पोपई**:—अगबाई !

**बाळुबाई**:—हं दूर व्हा पिलोबा. परस्त्रीला स्पर्श करणं तुम्हाला शोभतं कां ?

**पिलोबा**:—शोभतं, आमच्या वाड्यांत बाईसाहेबांना मुलगा व्हावा म्हणून स्त्रीलिंगी पदार्थांना आणि शब्दांना अर्धचंद्र मिळाल्यामुळं स्त्रीलिंगी शिवाशिव करण्याची मात्र सक्त मनाई आहे. पण पुरुषांना कुणालाही स्पर्श करायला मुळींच हरकत नाहीं. अहो तुम्ही तर या स्पर्शाला इतक्या भ्यालांत तर आमच्या वाड्यांत तुमचा पुल्लिंगी निभाव कसा लागेल ? तशांत आपण समदुःखी आहांत.

**अंजिऱ्या**:—बाई आपण कोण, कुठल्या, कुठं जायचं आहे ?

**बाळुबाई**:—मी बाळूबाई मिडवाईफ—रावसाहेबांकडे बाइसाहेबांचे बाळंतपणासाठीं, मिडवाईफ पाहिजे आहे, म्हणून मी आलें आहे.

**अंजिऱ्या**:—मग इथेंच कां उभ्या ? आंत चला, पोपई या बाईना आंत घेऊन जा बाईसाहेबांकडे.

**पिलोबा**:—( पोपईस ) घेऊन जा हिला आंत. ही मुलीची आई आहे. घेऊन जा हिला आंत. म्हणजे हिच्या आगमनानं बाईसाहेबांना मुलगीच होऊन तुझा माझा डाव फत्ते होईल ?

**पोपई**:—अस्सं—तर मग नेतेंच हिला आंत. चला हो बाई.

**अंजिऱ्या**:—हं. पण अहो बाई, थांबा, तुम्ही मुलीच्या आई आहांत कां मुलाच्या ?

**पोपई**:—ही मुलाची आई आहे—समजलास—?

**पिलोबा**:—हो, हो, ही मुलाची आई आहे. समजलास. जाऊंदे हिला आंत. अहो बाई याचं काय ऐकतां ! जा.

**बाळुबाई**:—पण मला—

**पिलोबा**:—पण तुम्हाला मुलगा आहे मला ठाऊक आहे. पुराव्याची जरूरी नाहीं. तुम्ही मुलाच्या आई आहांत तुमचा मुलगा माझ्या घरीं विसावा घेत घोरत पडला आहे. तुम्ही वाड्यांत खुशाल जा.

**पोपई**:—चलाहो मिडवाईफ बाई.

**बाळुबाई**:—पण मला—

**पिलोबा**:—तुम्हाला मुलाला बरोबर न्यायची जरूरी नाहीं. अंजिऱ्या ही बाई

मुलाचीच आई आहे. जा घेऊन हिला आंत. अरे हिला नेलंस म्हणजे बाई-साहेबांना सुद्धां चटकन् मुलगाच होईल.

**अंजिऱ्या:**—तर मग पोपई जा घेऊन हिला वाडयांत.

**पोपई:**—चला हो बाई.

**बाळुबाई:**—चल ( स्व. ) फार छान, पिलोबानं चांगली बतावणी केलीन नाहीं तर मला वाडयांत मज्जाव होऊन गांवचा रस्ता सुधारावा लागला असता. पिलोबा संभाळा हं माझ्या मुलाला. मी आतां परत येतें. ( जातें. )

**अंजिऱ्या:**—कायहो पिलोबा, हें काय आहे गाठोड्यांत ?

**पिलोबा:**—कांहीं नाहीं. कांहीं नाहीं—ती भाजी व फळें आहेत माझीं.

**अंजिऱ्या:**—दाखवा पाहूं, अरे बापरे, पिलोबा हीं स्त्रीलिंगी फळं व भाजी बाईसाहेबांना खायला द्यायचीं आहेत नाहीं कां ? आतां रावसाहेबांना सांगतों. रावसाहेब, रावसाहेब.

**वसंतराव:**—( येतात ) कायरे काय गडबड आहे.

**अंजिऱ्या:**—रावसाहेब पाहिलींत का हीं स्त्रीलिंगी फळं आणि भाजी ? बाई-साहेबांना मुलगी व्हावी म्हणून यानं ही स्त्रीलिंगी भाजी घरांत चालविली होती. पण पोपईनं वेळींच सुचवल्यामुळं याला मुद्देमालासह पकडून ठेवलं आहे.

**पिलोबा:**—अरे लबाडा, कायरे हा गहजब ? तसं नाहीं रावसाहेब. आत्तां ती बाळूबाई मिडवाईफ आली आहेना आपल्या घरांत. तीनं हीं फळं गांवाहून बरोबर आणलीं होतीं. पण हीं स्त्रीलिंगी फळं वाडयांत नेतां येत नाहींत, म्हणून तीं मी त्यांच्याजवळून मागून घेतलीं रावसाहेब. खरा प्रकार असा आहे रावसाहेब.

**वसंतराव:**—बरोबर आहे. अंजिऱ्या, पिलोबा कांहीं माझ्या वाईटावर नाहीं समजलास ? त्याच्याबद्दल उगीच संशय घेणं चांगलं नाहीं बरं. अरे मला मुलगा व्हावा म्हणून तर त्याची सारी खटपट आहे.

**पिलोबा:**—पहातर खरं रावसाहेब. हा अंजिऱ्या उगीचच माझा संशय घेतो. खरा प्रकार त्या बाळूबाईला विचारून घ्या पाहिजे तर ?

**वसंतराव:**—अरे पण ही बाळूबाई मिडवाईफ कोण ? ही मुलीची आई तर नाहींना ? नाहींतर हिला मुलगी व्हायची.

**इंदिरा**:—( बाळूबाईला आणीत ) बाप दाखीव नाहींतर श्राद्ध कर असा या वाड्यांतला कायदा आहे समजलीस ? तूं विधवा आहेस. तेव्हां तूं मुलीची आई आहेस कां मुलाची याची खात्री झाल्याशिवाय तुला वाड्यांत कशी घेतां येईल ? कायरे पिलोबा तूं चवकशी नि विचारपूस न करतां वाटेल त्या बायकांना खुशाल माझ्याकडे नोकरीला पाठवून देतोस ? याला म्हणावं तरी काय ? या मिडवाईफला मुलगी झाली होती असं कायसं पोपई पुटपुटली. म्हणून म्हणतें हिला आली तशी परत जाऊं द्या.

**वसंत०**:—पाहिलंस-पिलोबा, गध्या-विचारपूस न करतां तूं असा घोटाळा करून ठेवलास तो.

**पिलोबा**:—अहो पण ह्या मिडवाईफला मुलगा झालेला आहे. तो थकल्यामुळं माझ्या घरीं विश्रांति घेत आहे.

**बाळुबाई**:—शिवाय बाईसाहेब मी जिथं जिथं बाळंतपणाला जातें तिथं तिथं सारे मुलगेच होतात असा माझ्या हातचा गुण आणि प्रभाव आहे.

**पिलोबा**:—पहा पहा रावसाहेब. ही हातगुणी आणि प्रभावशाली आहे. म्हणून तर मी वर्तमानपत्रांत जाहिरात देऊन हिला मुद्दाम बोलावली.

**वसंतराव**:—खरंच कीं काय ? अग ऐकलंस कां ? तूं आतां ठेव या बाळूबाईला तुझ्या तैनातीला. अग हिच्या हातानं तुझं बाळंतपण झालं कीं तुला मुलगा हा ठेवलेलाच.

**इंदिरा**:—तर मग बाळूबाई-अग बाळूबाई रहाच तूं माझ्या तैनातीला. पण तुझ्या मुलालाही घेऊन ये माझ्या घरीं. तुझ्या हाताला जर यश आलं तर तुला काय वाटेल तें बक्षीस देईन.

**वसंतराव**:—पिलोबा, बाळुबाईच्या मुलाला नी बाळुबाईला लवकर घराकडे घेऊन ये. हिच्या हाताला यश यावं म्हणून मी हिला पुढं देणारं बक्षीस आत्तांच जाहीर करतों. बाळुबाई तुझ्या हाताला यश येऊन मला मुलगा व्हावा म्हणून मी आजच तुझ्या मुलाच्या नांवानं ५ हजाराचा चेक आत्तांच फाडून देतों. समजलीस ?

**इंदिरा**:—छान ! असं देवावर संकट घातलं म्हणजे तरी देव आपल्याला खात्रीनं मुलगा देईल. बाळुबाई ये बरं लवकर.

**बाळुबाई**:--बाईसाहेब मुलाला घेऊन मी उलटपावलीं आलेंच. आपण व्हा पुढं.

**इंदिरा**:—चला! आतां मोठ्या डोहाळजेवणाला ज्यांना बोलवायचं त्यांची यादी करून ठेवू चला.

**वसंतराव**:—चल— ( जातात. )

**बाळुबाई**—पिलोबा आतां कसं हो करायचं? आयते मला ५ हजार रुपये मिळत आहेत पण मुलगा कुठं आहे?

**पिलोबा**:—मुलगा, काय खुळी आहेस तूं? अग नवऱ्याशिवाय कां कुठं मुलगा होतो?

**बाळुबाई**:—समजलें तुमचं अंतःकरण?

**पिलोबा**:—अग रागावतेस कां? माझ्या युक्तीमुळें तुला ५ हजाराची प्राप्ती झाली. तेव्हां म्हटलं—तुला मुलगा अगोदर देतों पाहिजे तर पण मुलगा दिल्यानंतर त्याचा बाप होण्याचा मान मला घेऊं देशील कीं नाहीं?

**बाळुबाई**:—( स्व. ) काय ग बाई तरी याचा हा कावा. ( उघड ) पण पिलोबा आधीं मुलगा कुठं आहे तें दाखवाल कीं नाहीं.

**पिलोबा**:—ठीक–ठीक–अगदीं पसंत, सोळा आणे पसंत ( स्व. ) जमणार बरं कां हें. ( उघड ) चल दाखवतों मुलगा.

**बाळुबाई**:—पिलोबा, यावेळीं तुम्हीच माझी लाज राखा. आणि मुलगा देऊन मला धन्य करा. म्हणजे माझ्या जन्माचं सार्थक तरी होईल.

**पिलोबा**:—अग तुझी लाजच काय पण तुलासुद्धां राखायला हा पिलोबा दोन्ही पायावर तयार आहे. चल मिडवाईफ चल.

**बाळुबाई**:—तुम्ही मला देवच पावलांत ( जाते )

**पिलोबा**:—अग देव कसचा नी काय कसचं. बायकांच्या उपयोगी पडणं हा तर माझा धर्मच आहे. जमणार बरं कां हे कंत्राट.

---

## प्रवेश दुसरा

( मोहनचें घर )

**मालती**:—मला नाहीं बाई तुमचीं हीं कृष्णकारस्थानं आवडत. त्या दिवशीं मामंजीनी रावसाहेबांच्या घरीं तो तसा प्रकार केला हें शोभतं का? आणि हें कशाकरतां करतां?

**मोहन**:—मालती, अग रावसाहेबांची सारी इस्टेट ताब्यांत घेण्यासाठीं ही

आमची खटपट आहे बरं. या खटपटींत यश आलं म्हणजे तुला नाहीं का त्यांत ऐश्वर्य येणार ? आज तुझी दशा काय आहे पाहिलीस ? हाताला नाहीं पाटली, कानाला नाहीं बाळी, नी पायांत नाहीं साखळी.

**मालती:**—नकोग बाई मला साखळी. नसत्या उलाढाली करून तुम्हीं मात्र पायांत साखळी अडकवून घेऊं नका म्हणजे झालं !

**मोहन:**—अग आम्हीं खुळे का आहोंत ? आतां मिस् छुरी आली कीं सर्व पुढचे बेत कायम होऊन जातील.

**मालती:**—पण त्या दिवशीं रजिस्टरी करून दिलीत ना कीं तुम्हीं वसंतरावांचे कोणीही नाहीं म्हणून ?

**मोहन:**—त्यांत कांहीं नाहीं, बाबांची माझी गांठच नव्हती पडली म्हणून मी तसं लिहून दिलं पण आतां बंडोबा खुळखुळे म्हणतात, तेच माझे बाबा मधुकरराव, अग नातं कां कुठं नाहीं म्हटल्यानं तुटतं ? नातं तें नातंच. वसंतरावानं जो इस्टेट दानाचा लेख लिहिला आहे, तोच अखेर पक्का होणार.

**मालती:**—पण सासूबाईना जर मुलगा झाला तर कांहीं इस्टेट तुम्हाला मिळायची नाहीं. मग मी म्हणतें मिस् छुरीमार्फत तुमची खटपट तरी कशाची चालली आहे ?

**मोहन:**—तें तुला काय करायचं ? बायकांनीं नसत्या उठाठेवी करूं नयेत !

**मालती:**—कां बरं करूं नयेत ? नाथ मी तुमची आहे ना ? तुमच्या मनांतले विचार तुम्हीं जर माझ्यापासून चोरून ठेवलेत तर तुमचं माझ्यावर प्रेमच नाहीं म्हणायचं.

**मोहन:**—लाडके, उगीच आमच्या बेतांत मोडता कां बरं आणतेस ? तुला वैभव नको का ? तुला संपत्ती नको का ? दुर्दैवाच्या सपाटीवरून तुला ऐश्वर्य-गगनाच्या शिखरावर बसविण्याची माझी इच्छा आहे.

**मालती:**—मला वैभव पाहिजे, ऐश्वर्य पाहिजे, मला संपत्तीसुद्धां पाहिजे. पण वाईट मार्गाचं अवलंबन करून मिळविलेली संपत्ती मला नको. त्यापेक्षां आज मिळणारं कदान्नच मला श्रेष्ठ वाटतं. महाराज तुमचे हे डाव माझ्या लक्षांत आले बरं. मिस् छुरीच्या मदतीनं तुम्हीं सासूबाईना होणाऱ्या मुलाच्या नरडीला नख लावणार असाल पण—

**मोहन:**—हें काय बोलतेस ? सटवे माझ्या घरांतून चालती हो पाहूं. (छुरी येते) चल नीच अगोदर इथून, काळं कर, तुझं पापी मन मला फांसावर लटका-

वयाला सुद्धां कमी करणार नाहीं. इतःपर मला तुझ्यासारख्या डाकिणीचा सहवासच नको. चल चालती हो.

**छुरीः**—काय झालं मोहनराव असे बायकोवर कां रागावतां. बायकांवर रागावणं ठीक नाहीं.

**मोहनः**—मिस् छुरी, माझी ही बायको म्हणजे शुद्ध डाकीण आहे. हिला वाटतं कीं, मी तुझ्या हातून काकूच्या पोराच्या गळ्याला नख लावणार आहें. पाहिलेस हिचे हे दुष्ट विचार! असली ही दुष्ट बायको म्हणजे माझ्या गळ्यावर एक छूरीच आहे.

**छुरीः**—ओ–लो–मिसेस मालतीबाई–आम्हीं नर्स बायका असलं खराब काम कधींच करत नाहीं. तुमच्या मनांत कुणी भरवून दिलं!

**मालतीः**—चुकलं हो डॉक्टरीणबाई मला क्षमा करा.

**मोहनः**—( छूरीस ) मिस् छुरी बायकोला मी घालवून दिल्याशिवाय आपलं कारस्थान यशस्वी होणार नाहीं. हिला संशय पिशाच्चानं पछाडलं आहे. पहा तिची कावरी बावरी मुद्रा पहा.

**छुरीः**—असं असेल तर हिला दूर कराच!

**मोहनः**—बस! मालती तूं इथून एकदम काळं कर. मला तुझी जरूरी नाहीं. आमच्या गुप्त कारस्थानाला तुझं इथं राहणं वावडं आहे.

**मालतीः**—महाराज, लग्नाच्या वेळीं मला जन्मभर सुखांत ठेवण्याची जी शपथ अग्निदेवतेसमोर घेतलीत ती इतक्यांतच विसरतां काय? मी अजाण पोर. माझी चूक पोटांत नाहीं कां घालीत? मी चुकलें क्षमा करा.

**मोहनः**—नाहीं साफ नाहीं. तूं एकदम चालती हो. तुझा उपदेश मला नको आहे. संपत्ती हातीं आल्यावर तुझ्यापेक्षां शतपट ज्ञानी अशा एक सोडून १० बायका मी करीन समजलीस? चल नीघ!

**छुरीः**—पण मोहनराव १० बायका कशाला? मी आहे ना?

**मालतीः**—( स्वगत ) अग कवटाळणी! समजलें ग समजलें. आतां इथं राहाणंच नको. या नरकाच्या घाणींतून मी पाय काढलेलाच बरा. महाराज समजलें बरं तुमचं कारस्थान. या सटवीला तुम्हाला राणीपदावर चढवायचं आहे ना? चढवा बरं–पण ध्यानांत ठेवा ही पांढरी हत्तीण एकदां घरांत शिरली कीं आपल्या सोंडेनं तुमचासुद्धां चकणाचूर करील. चाललें मी—

अं. २ रा. प्र. २




मोहन                    मालती

पद

**न राहिना, न राहिना, न राहिना, । तुम्हांसवें न राहणें मना ॥ धृ० ॥ पाप कुपिं जरि देह वसे हा । नर्क कुंड हें भवन नाहीं हें ॥ १ ॥**

**छुरीः**—चले जाव—( मालती जाते. )

**मोहनः**—छान झालं. पिडा टळली. मिस छुरी बाबांचा काय विचार ठरला ?

**छुरीः**—दुसरा कोणता विचार ठरणार ? इंदिराबाईंना गर्भ नष्ट होण्यासाठीं औषध द्यायचं. त्यांत यश न आलं तर बाईसाहेबांच्या मुलाचा जन्म होतांच त्याला यमसदनाला पाठवायचं.

**मोहनः**—शाबास. मिस् छुरी शाबास. पण ह्या कामीं आम्हांला सर्वस्वी तुझीच मदत पाहिजे.

**छुरीः**—हो मदत तर करीनच पण मदतीचा मोबदला काय देणार आहांत ?

**मोहनः**—देईन एक हजार रुपये देईन.

**छुरीः**—रुपये काय करायचे आहेत. ते केव्हांच खर्च होऊन जातील. मोहनराव मी मिस् आहें. माझ्याशीं लग्न करून मला मिसेस करा, एवढीच इच्छा आहे.

**मोहनः**—प्यारी–छुरी–यावेळीं तूं अगदीं कसं माझ्या मनासारखं बोललीस, तुझ्या मिस्पणाला डिसमिस करून मी तुला माझी मिसेस करीन. अगदीं खात्रीनं करीन.

**छुरीः**—तर मग मोहनराव आजपासून तुम्ही माझे हस्बंड् आणि मी तुमची बिलव्हेड्.

**मोहनः**—कबूल. पण काम फत्ते झालें पाहिजे.

**छुरीः**—काम तर फत्ते करीनच. असलीं कामं म्हणजे आमच्या हातचा नुसता मळ आहे.

**मोहनः**—अहाहा प्यारी छुरी अशी जवळ ये.

**छुरीः**—थांबा. तुम्हां पुरुषांचा काय नेम सांगावा. तुमचं जर माझ्यावर मन गेलं आहे तर माझ्याशीं लग्न करण्याचं वचन देऊन दहा लाखांची इस्टेट माझ्या नांवानं लिहून द्या. आणि मग प्रेमाच्या गोष्टी करा.

**मोहनः**—तूं माझी झाल्यावर ही सारी इस्टेट तुझीच होणार आहे. मी तुझा दास तुझ्या कृपाछत्राखालीं विसावा घेत पडून राहीन. तुला लखच पाहिजे आहे का ?

छुरीः—कांहीं नको. लेखाची आतांच जरूरी नाहीं. काम फत्ते झाल्यावर मग मी तुला थोडाच सोडणार आहे.

**पद**

**हा जिवलग माझा प्यारा । दुलारा । दिलारा । ही**
**दिलखुष तुमची प्यारी । रंगीली रसीली ॥ ध्रु० ॥**

**मोहनः—सुरंगी रंगले, सुमन फुललें ।**

**छुरीः—ही मोहना राणी कोमल कमली । मधुकर मोहन**
**मजला प्यार ॥ १ ॥**

---

## प्रवेश ३ रा

( रस्ता )

**पिलोबाः**—पोरा तुला, आई नाहीं, बाप नाहीं–तूं पडलास पोरका पोर म्हणून तर मला तुझी कीव येऊन मी तुला फक्कडशी आई मिळवून देण्याचं ठरवलं आहे.

**दिवाकरः**—काय मला तुम्ही आई मिळवून देणार ? फक्कडशी आई मिळवून देण्यापेक्षां मला फक्कडशी बायको कां नाहीं पाहून देत ? देतां कां मला फक्कडशी बायको मिळवून ?

**पिलोबाः**—अरे तुला कशाला पोराला एवढ्याशा चिमुरड्या वयांत बायको पाहिजे ? मोठा हो म्हणजे बायको सुद्धां मिळवून देईन. प्रथम आईतर पटकाव. त्यांत तुझा लाभ आहे. तुझं कल्याण आहे. समजलास ? असा भिकारड्या सारखा दारोदार हिंडतोस तेव्हां आई पत्करून मोकळा हो कसा ?

**दिवाकरः**—आज तुम्ही मला आई मिळवून देतां आहांत आणि उद्यां म्हटलं बाप सुद्धां मिळवून द्याल, कां म्हटलं तुम्हीच होणार माझ बाबा ?

**पिलोबाः**—अरे तें पुढचं पुढं पाहिलं जाईल. पण अगोदर आई पत्करायला तयार हो.

**दिवाकरः**—पण माझ्या नव्या आईला मी नाहीं तुमच्याशीं लग्न करूं देणार.

**पिलोबाः**—अरे पण तुझी परवानगी नको आमच्या लग्नाला–तूं परवानगी देऊं नकोस मग तर झालं ना ?

**दिवाकर**—तर मग द्या मला आई मिळवून, कुठं आहे माझी आई ? दाखवा दाखवा म्हणतों ना माझी आई.

**वाळूबाई:**—( येऊन ) पिलोबा, देतांना मला पाहून मुलगा ? कुठं आहे—माझा मुलगा ?

**पिलोबा:**—हा बघ—हा तुझा मुलगा—याचं नांव दिवाकर बरं. चांगलं पाठ करून ठेव !

**वाळुबाई:**—( स्व. ) अगबाई, या मेल्यानं खरंच की हो मला मुलगा मिळवून दिलान. फार छान झालं—हाच ना माझा मुलगा.

**पिलोबा:**—अग हो, शंका का वाटते ? हाच तुझा मुलगा. दिवाकर ही बघ तुझी आई—भेट तिला कडकडून.

**दिवाकर:**—कसं भेटूं हो कडकडून ?

**पिलोबा:**—हात् लेका—आतां मी कां दाखवूं तुला कसं भेटतात कडकडून तें ? अरे लोक काय म्हणतील ? खुळ्या पोरा—भेट आपल्या आईला.

**दिवाकर:**—पण पिलोबा मला पाहून माझ्या आईला प्रेमाचा पान्हा फुटेल कां हो ?

**पिलोबा:**—अरे प्रेम फुटेल पण पान्हा कुठनं फुटणार ? भेट बाबा भेट तिला.

**दिवाकर:**—आई ( भेटून ) तूंच ना ग माझी आई ?

**वाळुबाई:**—दिवाकर मीच बरं तुझी आई, तुझ्यासाठीं रावसाहेबांनीं हा पांच हजारांचा चेकसुद्धां पाठवला आहे बरं. तुझं नशीब थोर म्हणून तुला आईचं सूख मिळून वर पांच हजारांची ही देणगी सुद्धां मिळाली बरं, दिवाकर आतां आपण रावसाहेबांकडे रहायला जायचं बरं कां ?

**दिवाकर:**—कशाला आपण पिलोबाकडच राहूं ना ?

**पिलोबा:**—बाळुबाई, पोराचा हट्ट आईनं नाहीं तर कोणी पुरवायचा ? या भाग्यवान् मुलाचा हट्ट तूंच पुरवला पाहिजेस. या पोराच्या मनांतून तूं रावसाहेबांचेकड न राहतां माझ्या घरीं सुखानं राहावं असं आहे. मी पाहीन तुझा खासगी कारभार.

**वाळुबाई:**—( स्वगत ) खासगी कारभार ? अरे मेल्या ? ( उघड ) पण आधीं याला घेऊन रावसाहेबाकडं जायचं आहे नां आपल्याला ?

**दिवाकर:**—पण काय ग आई मला पांच हजारांची देणगी मिळाली नी आईही पण मिळाली. आतां म्हटलं माझे बाबा, मला केव्हां मिळवून देणार सांग ना ?

**पिलोबाः**—( स्वगत ) या पोराचा बालहट्ट माझ्या पथ्यावर पडणार म्हणायचा. ( उघड ) पोरा–अरे तुझा बाप तर स्वर्गवासी झाला आहे. आतां तुला बाप कसा मिळणार ? तुझ्या आईनं जर पुनर्विवाह केला तरच तुला बाप मिळण्याची आशा आहे.

**बाळुबाईः**—पिलोबा समजतात बरं कां मला हीं बोलणीं !

**पिलोबाः**—चुकलों, चुकलों, सपशेल चुकलों–साफ घसरलों-चारी मुंड्या चीत झालों ! या पोराच्या देखत मी उगाच तुझ्याशीं पुनर्विवाहाची गोष्ट काढली. ही गोष्ट एकांतांत काढायला पाहिजे होती ? असंच ना बाळूबाई ?

**बाळुबाईः**—पिलोबा फार वहावत चाललांत हं. जाहिरातीला भुलून इथवर येऊन मी फशी पडले, म्हणून कांहीं शील भ्रष्ट नाहीं झालें समजलांत ? जीभ आवरून धरा नाहींतर जमीन दोस्तच करीन !

**पिलोबाः**—कर कर जमीन दोस्त कर. अग तुझ्या हातानं मी जमीनदोस्त व्हायला तयार आहें.

**दिवाकरः**—पिलोबा जीभ आवरून बोला, खबरदार माझ्या आईला उणी उत्तरं बोलाल तर, मला बाबा नको आहेत समजलांत ?

**पिलोबाः**—बरं राहिलं, बाबा नको असेल तर बाबी घे.

**अंजिऱ्याः**—( प्र. क. ) पिलोबा रावसाहेब तुम्हा तिघांची वाट पहात आहेत. चला लवकर वाड्याकडे. आणि डोहाळेजेवणाचीं आमंत्रणं केलीं कीं नाहीं ?

**पिलोबाः**—केलीं, पारुबाई, सारुबाई, वारुबाई, साऱ्यांना फैलावर चढवून बोलावणी सुद्धां केलीं. चल ! बाळुबाई–चलरे दिवाकर. ( सर्व जातात. )

---

## प्रवेश ४ था

( दिवाणखाना—पोपई पेटी वाजवीत बसलेली आहे. )

**अंजिऱ्याः**—बंद कर–बंद कर–ही स्त्रीलिंगी पेटी वाजवून बाईसाहेबांना फटकन् मुलगी होईल कीं ?

### पद

**अंजिऱ्याः—बंद कर स्त्रीलिंगी बाज्याची पेटी ।**
**पोपईः—राव देतां कां हो दमदाटी ॥ धृ० ॥**

**अंजिऱ्याः**—**काय सुराची केलीस सुलटी। काय तालाची**
**केलीस उलटी। काय रागाची काढलीस सालटी॥ १॥**
**ही स्त्रीलिंगी बाज्याची पेटी। बाईसाहेबांची होईल**
**बेटी। तुला कुठून मिळेल रोटी ?॥ २॥**

**पोपईः**—तर मग करमणुकीसाठीं काय वाजवूं ?

**अंजिऱ्याः**—हातबाज्या वाजीव, तोंडबाज्या वाजीव, नाहींतर बेंडबाज्या वाजीव.

**पोपईः**—कां फोनोग्राफ लावूं ?

**अंजिऱ्याः**—लाव. पण हो समजलों. बाईसाहेबांना मुलगी होईल अशी तूं पैज लावली आहेस नाहीं का ? आणि म्हणूनच ही स्त्रीलिंगी पेटी वाजवीत होतीस नाहीं ? पण पोपई तुला सांगून ठेवतों कीं तूं कितीही जरी प्रयत्न केलास तरी बाईसाहेबांना मुलगाच होणार. आन् तूं माझी होणार.

**पोपईः**—बरं तसं कां होईना. जें दैवीं असेल तें होईल.

**अंजिऱ्याः**—पोपई मी फार उतावीळ झालों आहेग. नऊ महिने भरल्याशिवाय नाहीं का ग बाईसाहेबांना मुलगा होणार ? लवकर मुलगा होण्याचं एकादं औषध असेल तर पहाना ?

**पोपईः**—आत्तां मिस् छूरी आणि डॉ. पेननाईफ इथं बाईसाहेबांची प्रकृती पहायला येणार आहेत. त्यांना विचारून पहा एकादं औषध असेल तर.

( मालती येते. )

**मालतीः**—मुली सासूबाई कुठं आहेत ?

**पोपईः**—सासूबाई ! कोण सासूबाई ?

**मालतीः**—इंदिराबाई माझ्या सासूबाई आहेत.

**अंजिऱ्याः**—इंदिराबाईसाहेब तुझ्या सासूबाई आहेत ? ह. ह. ह. पोपई अग मुलाला अजून ठिकाणा नाहीं आणि सुनबाई तयार ! काय इंदिराबाईची तूं सून आहेस ?

**मालतीः**—होय.

**पोपईः**—अजून मुलाला ठिकाण नाहीं. आणि सून कुठून येईल—? अंजिऱ्या ही बाई वेडीपिशी असेल झालं.

**अंजिऱ्याः**—कांहीं कां असेना ! ही ज्या अर्थी सून आहे म्हणते त्या अर्थी हिची व्यवस्था केलीच पाहिजे. रावसाहेबांना सांगून टाकूं. रावसाहेब–रावसाहेब—( वसंतराव व इंदिराबाई येतात. )

**वसतरावः**—कायरे गाढवा—काय आरडाओरडा आहे ? ही कोण ?

**अंजिऱ्याः**—पुल्लिंगी आरडाओरड्याला सदर परवानगी आहे सरकार. ही तुमची सून तुमची वाट पहात आहे.

**वसतरावः**—सून ? गध्या, मुलाला अजून ठिकाणा नाहीं आणि इतक्यांत सून कशी टपकली ?

**अंजिऱ्याः**—ईश्वराची लीला अगाध आहे रावसाहेब आज काल मुलाचा अवतार होण्यापूर्वीच सून तयार करण्याचा ईश्वरानं नवीन प्रघात घातलेला दिसतो. करतां कसं ? आलेली लक्ष्मी लाथाडूं नका.

**मालतीः**—सासूबाई मी मोहनरावांची भार्या आहे. त्यांचीं एक एक कृष्ण-कृत्यं पाहून मी त्यांना टाकून बोललें आणि त्यांनीं मला घरांतून हाकून लावली. आतां आपणच मला आश्रम द्यावा. मी अनाथ पोर कुठ जाऊं ?

## पद

**अजि करा रक्षणा । मजकरी पावना करुणाकरा ।**
**करुणाकरा ॥ धृ० ॥ संकटवारा तारा । मज नाहीं**
**आसरा । मम भीतीही निवारा । करुणाकरा ॥ १ ॥**

**अंजिऱ्याः**—पण बाईसाहेब ही मुलाची आई असेल तर राहूं द्या हिला घरांत. नाहींतर हिला एकदम घालवून द्या. हो नाहींतर तुम्हाला मुलगी व्हायची.

**पोपईः**—बाईसाहेब या अनाथ गाईला दूर लोटूं नका बरं.

**अंजिऱ्याः**—हो हो तर ! तुला काय होतंय ? बाईसाहेबांना फटकन मुलगी होईल ना ?

**पोपईः**—होईना—पहिली बेटी अन् तूप रोटी.

**वसंतरावः**—चूप, पोपई—चूप रहा. भलतंच बोलशील तर हांकून देईन घरांतून—माझ्या या घरांत मुलगा—मुलगा—मुलगा—असा प्रचंड जयघोष माझ्या नोकर माणसांनीं केला पाहिजे. हा माझा हुकूम जारी झाला नाहीं कीं काय ? कायरे अंजिऱ्या—?

**अंजिऱ्याः**—हुकूम जारी आहे सरकार, पण अगोदर या सुनेचा निकाल तर करा लवकर !

**इंदिराः**—सूनबाई, मोहननं तुला घराबाहेर काढलं हें जरी वाईट केलं तरी मी बाळंत होईपर्यंत तुला माझे घरांत ठेवतां येत नाहीं. तू माहेरच्या कोणा

नातेवाइकाकडं चार दिवस जाऊन रहा. पुढं मी तुला आश्रय अवश्य देईन समजलीस ?

**मालती**:—सासूबाई मला दूर नका हो लोटूं मी अनाथ ! मला माहेरचं मायेचं कोणीही नाहीं हो. तुम्हींच माझं संगोपन केलं पाहिजे. इथंच राहून मला मोहनरावांचं कारस्थान हाणून पाडावं लागेल.

**वसंतराव**:—असं कोणतं कारस्थान त्यानं रचलं आहे ? आम्हांला मुलगा होणं किंवा मुलगी होणं हें कांहीं त्याच्या हातांत नाहीं. आम्हीं त्याच्या कारस्थानाची मुळींच पर्वा करीत नाहीं. आम्हांला मुलगा होणार हें निर्विवाद सत्य आहे.

**मालती**:—तर मग मामंजी मला रहायला काय हरकत आहे ? इथं पाहिजे तर मी तुमची बटीक म्हणून वावरेन. उघडपणें मी कोण आहे हें कोणासही कळूं देणार नाहीं !

**पोपई**:—तर मग बाइसाहेब राहूं द्या मालतीबाईंना आपल्या घरांत.

**अजिऱ्या**:—हो हो तर-तें कांहीं नाहीं-यांना घरांत ठेवूं नका रावसाहेब. ( जातो )

**वसंतराव**:—राहूं दे ? मालती तूं खुशाल रहा इथं. या अनाथ सुनेला मला आश्रय दिलाच पाहिजे.

**मालती**:—देव तुमचं कल्याण करो. आणि तुम्हांला मुलगाच होवो.

**पद**

**मनिची आवड पुरली माझि गे । ये उदरीं सुत आजि गे ॥ धृ० ॥ संचरली परमेश कृपा ही । करील सुखी अति राजी गे ॥ १ ॥**

**इंदिरा**:—शाबास-सुनबाई-शाबास-पोपई हिला आंत थोडं फराळाला दे जा.

**वसंतराव**:- जा मालती-अगोदर फराळ कर ( मालती व पोपई जाते. )

पिलोबा ( येऊन ) रावसाहेब ही बालमासिकाची व्ही. पी. सुंदर वसंत या नांवाची आली आहे. आकार ३ रु. ४ आणे.

**इंदिरा**:—बाई-बाई, शर्थ झाली आतां तुमच्या पुढं. अहो अजून मुलग होण्याला ठिकाण नाहीं आणि तुम्हीं त्याच्या नांवानं व्ही. पी. सुद्धां बोलावली ?

**पिलोबा:**—मग काय रावसाहेब व्ही. पी. कोण घेणार ?

**नवग्रह:**—तो नाहीं घेणार तर त्याचा बाप घेईल. घ्या रावसाहेब, व्ही. पी. सोडवून घ्या.

**वसंतराव:**—पण व्ही. पी. ७ दिवस राहूं शकते ना ?

**नवग्रह:**—पोष्टाच्या नव्या नियमाप्रमाणें व्ही. पी. सात दिवस राहूं शकेल पण बाळंतपण होण्याचे दिवस मात्र नऊ महिन्यापेक्षां कमी होऊं शकत नाहींत. त्यांतून निदान दोन अडीच महिने लागतील सुंदर वसताचा अवतार व्हायला.

**पिलोबा:**—तर मग रावसाहेब तुम्हीच घ्या ही व्ही. पी. आणि आपल्या नांवाचं पत्र आहे. ( सही करून घेऊन जातो. )

**वसंतराव:**—( पत्र वाचतो. )

॥ श्री ॥

कृ. सा. न. वि. वि. सुंदर वसंत या नांवाचा एक मुलगा तीन महिन्यापासून न्यू प्रायमरी स्कूलांत पहिल्या वर्गात दाखल केला आहे. परंतु तो अद्याप शाळेंत येत नाहीं तरी तो कां येत नाहीं तें कळवावें व त्यास शाळेंत लवकर धाडावें.

आपला,

**नंदिलाल पशुपती हेडमास्तर,**

न्यू प्रायमरी स्कूल–अलमटोला जि. टमटम.

**इंदिरा:**—बाई बाई शर्थ झाली–या नंदिलाल पशुपतीनं कुणाला विचारून माझ्या लाडक्याचं नांव शाळेंत घातलं ?

**वसंतराव:**—मी नाहीं घातलं. हे पिलोबाचं काम असावं. पिलोबा—

**पिलोबा:**—काय महाराज ?

**वसंतराव:**—अरे सुंदर वसंत याचं नांव न्यू प्रायमरी स्कुलांत इतक्यांत कसं कुणी दर्ज केलं ?

**पिलोबा:**—मी. का बरं काय भानगड झाली !

**वसंतराव:**—हे हेडमास्तर विचारतात कीं सुंदर वसंत अजून शाळेंत कां येत नाहीं. अजून तर त्याचा जन्मच नाहीं आणि मग तो जाणार कसा ? पिलोबा तुम्ही शुद्ध अडणीवरचे शंख आहांत झालं ?

**पिलोबा**:—लग्नामध्यें मी अडणीवरच जेवलों होतों.

**नवग्रह**:—पण पिलोबा शाळेंत नांव टाकण्याची इतकी घाई कां केली ?

**पिलोबा**:—मुद्दामच केली. कारण आजकाल पोरांना वर्गांत जागासुद्धां मिळत नाहीं. प्रत्येक वर्गांत फक्त ३५ मुलें घ्यायचीं असा शाळाखात्याचा नियम आहे. म्हणून तर आतांपासून सुंदररावांचें नांव दर्ज केलं.

**नवग्रह**:—आणि त्याची जन्म तारीख कोणती लिहिलीस ?

**पिलोबा**:—जन्म झाल्यावर लिहिली जाईल ! तो कॉलम मोकळाच ठेवला आहे.

**वसंत**:—वाः ! नांव अगोदर दर्ज आणि जन्म नंतर ! पिलोबा निव्वळ गध्धा आहेस. हेड मास्तरांना सांग त्याचें नांव तूर्त काढून टाका, पुढें दर्ज करूं जा.

**इंदिरा**:—पिलोबा, आणखी तर नाहीं ना घोटाळा करून ठेवलास ? आणि इतकं करून मुलगा न झाला तर माझी केवढी फजिती होईल ?

**अंजिऱ्या**:—( प्र. क. ) फजिती मुळींच होणार नाहीं. झाला तर फजिताच होईल. रावसाहेब सुंदररावांचे कपडे घेऊन शिंपी आला आहे. याहो शिंपी बुवा. ( येतो. )

**शिंपी**:—रावसाहेब कपडे कालच तयार झाले होते पण काल बटणं राहिल्या-मुळं उशीर झाला.

**इंदिरा**:—बाई ! बाई ! शर्थ झाली. माझ्या सोनुल्याचे कपडे सुद्धां शिवून आले. सोनुल्या घेरे बाबा तूं आपला अवतार लवकर.

**शिंपी**:—सुंदररावांच्या अंगांत तर घालून पहा. अगदीं फिट्ट केले आहेत.

**नवग्रह**:—पण कायरे ए सुइ दोरीच्या ! हे कपडे नि हे सूट तू कोणाच्या आंगचे शिवलेस ? माप कोणाचं घेतलंस ?

**शिंपी**:—रावसाहेब आम्हीं मुंबईहून शिकून आलेले आहोंत. आम्हाला माप-बीप घेण्याची जरूरी नाहीं. कपडे अगदीं फिट् केले आहेत. फिट् न झाले तर परत घेऊन जाईन.

**नवग्रह**:—तर मग ने परत-फिट् होत नाहींत.

**शिंपी**:—ढिले होतात कीं तंग ?

**नवग्रह**:—अरे ढिलेही होतात नी तंगही पण होतात. जा घेऊन परत.

**शिंपी**:—पण कायहो रावसाहेब तुम्ही अंगांत घालून पाहिल्या शिवाय कसं सांगतां हो कीं ढिलेही होतात नी तंगही होतात. ?

**नवग्रहः**—तर मग बाबा रताळ्या मुलाच्या आंगचें माप न घेतां तूं तरी हे कपडे अगदीं फिट् कसे केलेस सांग पाहूं.

**शिंपीः**—ठीक आहे. द्या, परत घेऊन जातो.

**इंदिराः**—नको नको राहूंदेत?

**वसंतः**—पिलोबा कपड्याचं बील देऊन टाक!

**पिलोबाः**– बिल काय झालं आहे कपड्याचं!

**शिंपीः**—बारा रुपये बारा आणे.

**वसंतरावः**—देऊन टाक.

**इंदिराः**—अंजिऱ्या हे कपडे आंत नेऊन ठेव. आणि रोज साफसूफ ठेवीत जा.

(पिलोबा शिंप्याला देण्याकरितां १३ रुपये अंजिऱ्याजवळ देतो. शिंपी ४ आणे परत देतो ते ४ आणे अंजिऱ्या आपल्या खिशांत ठेवतो.)

**नवग्रहः**—कायरे ए, ते चार आणे खिशांत कशाला ठेवतोस?

**अंजिऱ्याः**—त्या स्त्रीलिंगी आणेल्या आहेत. वाड्यांत नाहीं ठेवायच्या त्या मी माझ्या स्त्रीलिंगी झोंपडींत ठेवतों.

**नवग्रहः**—अरे लबाडा!

**वसंतरावः** लाडके आतां सुरू झाली बरं मुलाची तयारी. आतां ही मुलाची तयारी म्हणजे देवावर संकटच आहे. आतां एवढ्या तयारीनंतर मुलगा हा झालाच पाहिजे. बरं आतां उद्यां आपल्या घरचं मोठं डोहाळजेवण आहे. त्याबद्दलची बोलावण्याची यादी केलीस का तयार?

**इंदिराः**—पिलोबानं यादी तयार केली नी पोपई बोलावणींसुद्धां करायला गेली. फक्त मुलगे झालेल्या बायकांना उद्यांच्या डोहाळ जेवणाला बोलावलं आहे.

**नवग्रहः**—म्हणजे आमच्या हिला नाहीं कां बोलावली?

**पिलोबाः**—तुमच्या हिला तर साऱ्या मुलीच मुली झाल्या आहेत म्हणून बोलावणं केलं नाहीं.

**अंजिऱ्याः**—अररर्, या मुलीच्या बापाला वाड्यांत कसें येऊं देतां? अहो यांना काढा बाहेर.

**नवग्रहः**—थांबा मला बाहेर काढण्याची मुळींच जरूरी नाहीं. माझी बायको इतक्यांत बाळंत होऊन तिला मुलगासुद्धां होईल?

**पोपईः**—(धावत येते) झाला मुलगा झाला, शास्त्रीबुवांना मुलगा झाला. ही घ्या साखर.

**नवग्रहः**—ऐका रावसाहेब—

### साकी

**बाल रवी ये सदनी उदया कुल हें उद्धराया**
**शकुनचि भासे हा मम हृदया पुत्र तुम्हासहि व्हाया**
**प्रभाव गणिताचा, वैभवशाली हा साचा ॥ १ ॥**

**अंजिऱ्याः**—अग साखर काय वाटतेस? खुळी कुठली पुल्लिंगी पेढे आण पेढे!

**नवग्रहः**—अरे अंजिऱ्या पेढे आण.

**अंजिऱ्याः**—पैसे?

**नवग्रहः**—अरे दे तुझ्याजवळचेच मघाचे ठेवलेले चार आणे. नाहींतर असं कर, चार आण्याचा गूळ घेऊन ये गूळ—पुष्कळ येईल. (जातो.) ए पिलोबा आतां माझ्या बायकोचं नांव यादींत दर्ज कर.

**पिलोबाः**—पण नांव काय तुमच्या बायकोचं?

**नवग्रहः**—अरे लबाडा, आतां अशा म्हातारपणीं माझ्याकडून माझ्या बायकोचं नांव वदवतोस काय?

**इंदिराः**—घ्या नांव शास्त्रीबोवा कांहीं हरकत नाहीं. उखाणा घेऊन घ्या.

**नवग्रहः**—"जवळ होता कोनाडा—त्यांत होता कोळसा, जेहेत्ते माझ्या बायकोचं नांव म्हाळसा."

**इंदिराः**—ठीक तुम्हांला मुलगा झाला हा मला चांगला शकून झाला.

**वसंतरावः**—झालं, भोंवतालचं सारं वातावरण मुलगामय होऊं लागलं. शास्त्रीबुवा, या आपल्या मोहोल्याचं नांव "मुलगा मोहल्ला" ठेवल्याबरोबर तुम्हाला पहिला मुलगा झाला. आतां या मुलगा मोहल्यांत सारे मुलगेच जन्माला येतील.

---

## प्रवेश ५ वा

(रस्ता)

**पिलोबाः**—दिवाकर-तूं तरी घाल बाबा तुझ्या आईची समजूत.

**दिवाकरः**—आई-अग आई, अग बोलत कां नाहींस?

### पद

**बोला मधु बोले। तूं मज आई। सुचत मजसि ना कांहीं ॥ धृ० ॥ प्रेमरसाची मूर्ती आई। तूंचि खरीगे सुखदायी ॥ १ ॥**

या पिलोबावर अशी रागावलीस कां ? यांच्या कृपेनं तर मला पांच हजाराची देणगी मिळाली.

**पिलोबाः**—आणि माझ्या कृपेनं रावसाहेबांच्या घरचा आश्रय मिळाला, हें नीट तिला समजावून सांग.

**बाळुबाईः**—पिलोबा, हें सारं जरी खरं असलं तरी तुमचे दुष्ट विचार मनांतल्या मनांत दाबून टाका. इतर बाजारबसव्या नर्सप्रमाणें मी नाहीं. मला तुमच्याशीं पुनर्विवाह मुळींच करायचा नाहीं. तुम्ही इतःपर मला छेडीत जाऊं नका. मी आपली या पोराला घेऊन दुसरीकडे जाऊन रहातें पाहिजे तर.

**पिलोबाः**—या पोराला घेऊन जातेस काय ? आणि मी बरा जाऊं देईन. बाळुबाई मुकाट्यानं माझ्या म्हणल्याला रुकार दे. नाहींतर मी रावसाहेबांना खरा प्रकार सांगून तुला गांवांतून घालवून देईन किंवा फसवा फसवीचा आरोप ठेऊन तुरुंगाची हवा दाखवीन. बाळुबाई सोड त्या मुलाला. हा पोर तुझा मुलगा नाहीं. चल येरे इकडे दिवाकर. ( दिवाकराला ओढूं लागतो. )

**दिवाकरः**—चूप बसा पिलोबा. खबरदार मला असें झोंबाल तर. मी आरडाओरड करून सारा गांव जमवीन. आणि तुमचे दुष्ट विचार जगापुढं जाहीर करीन. या साध्वीला तुम्ही कां म्हणून छळतां ?

**पिलोबाः**—( स्वगत ) पोर बावचळला–आतां तंत्रा तंत्रानच घेतलं पाहिजे.
( उघड ) हं–हं–हं–हं– ( हासतो. )

**बाळुबाईः**— म्हणजे—अहो हसतां काय असे वेड्यासारखे ?

**दिवाकरः**—वायुबियु झाला असेल.

**पिलोबाः**—अग बाळूबाई ! तुम्ही अगदीं फसलांत. माझ्या सारखा सज्जन माणूस उभ्या जन्मांत पहायला सांपडणार नाहीं. अलीकडच्या छचोर नर्सींचा थिल्लरपणा पाहून तूं तशी आहेस कीं काय याची मी केवळ परिक्षा घेतली. पण तूं किती भ्यालीस–किती घाबरलीस–नाक काय फेंदारलंस–डोळे काय वटारलेस ?

**बाळुबाईः**—हं.

**पिलोबाः**—ओंठ काय फुरफुरलेत. तुम्हांला काय वाटलं मी घाबरून गेलों, नाहीं ? बाकी बाळुबाई हा पोर मोठा धूर्त आहे. माझ्याच परिक्षेचा आहे.

**बाळुबाई**:—पिलोबा, न समजून मी तुम्हाला कांहीं उणं पुरं बोललें असेन तर त्याची मला क्षमा करा. तुमचं थोर हृदय मी चांडाळणीनं मुळींच ओळखलं नाहीं.

**पिलोबा**:—अहो बरोबरच आहे, पुरुषांची जात नाहीं तरी दुष्टच असते. आम्ही पुरुषच तुमच्यासारख्या अनाथ पोरींना बिघडवण्यास कारणीभूत होतों. मी म्हणतों तुमच्या सारख्या अनाथ अबलांवर दृष्टी ठेवण्यापेक्षां आम्ही आमची दृष्टी जर परमेश्वराकडं वळवली तर पुण्यसंचय करून स्वर्गारोहण तरी करूं. पण कुबुद्धीचा पगडा शिरावर वावरूं देऊन शेणांतल्या किड्याप्रमाणं घाणींतच बुचकळ्या मारण्याची चटोर पुरुषांना गोडी वाटते हे देशाचं नी अबलांच दुर्दैवच म्हणायचं.

**बाळुबाई**:—पिलोबा–तुमच्या सच्छील अंतःकरणाला दुखवलं, त्याचं निरसन मी कसं करूं ? तुमच्या उपकाराची मी—उतराई कशी होऊं ? सांगा मला एकादा मार्ग असेल तर सांगा.

**पिलोबा**:—( स्व. ) जमणार बरं कां हे कंत्राट.

**दिवाकर**:—आई तुझ्या अपराधाबद्दल मी त्याचे पाय धरतों पाहिजे तर. ( पाय धरून ) पिलोबा.

**पिलोबा**:—छे छे छे–पोरा अरे यांत अपराध कसला ? तुझी आई मला टाकून बोलली त्याबद्दल मला मुळींच राग नाहीं बरं. ऊठ पोरा ऊठ–आतां, आपल्याला रावसाहेबांच्या घरीं जायचं आहे ना ? टांगा आला कां पाहून ये बरं ?

**दिवाकर**:—ठीक आहे आतां पाहून येतों. पण पिलोबा, संभाळा बरं आईला दुःख होईल असं कांहीं बोलूं नका बरं. नाहीं तर मी जातच नाहीं इथून.

**बाळुबाई**:—पिलोबा, या दीन अबलेला क्षमा करा.

**पिलोबा**:—अग छे अशा रीतीनं अपराधाचं निरसन काय करतेस ? निरसन करण्याचे दुसरे सोपे मार्ग आहेत ते मी तुला हळूहळू सांगेन. चल आतां रावसाहेबाकडं जायचं आहेना ?

**बाळुबाई**:—होय चला. मला किनई तुम्हाला सोडून दुसरीकडं क्षणभर सुद्धां राहूं नये असं वाटूं लागलं आहे.

**पिलोबा**:—अग वाटायचंच. ( स्व. ) जमणार–जमणार बरं कां हें कंत्राट.–आहेच मी तसा सज्जन ! ( जातात. )

---

## प्रवेश ६ वा

( दिवाणखाना )

[ डोहाळ जेवणाचा सीन ]

**सुलोचनाः**—शारदाबाई, मला तर असं वाटतं कीं ज्या अर्थी इंदिराबाईंना या वयांत गर्भ सोहाळे प्राप्त झाले आहेत, त्याअर्थी देवकृपेनं त्यांना मुलगाच होईल.

**शारदाबाईः**—हें सर्व तुम्ही कशावरून म्हणतां ?

**सुलोचनाः**—अहो कशावरून म्हणजे काय ? सारं वातावरण पुल्लिंगानं कसं नटून गजबजून गेलं आहे. आणि इंदिराबाईंची आवड सुद्धां पुल्लिंगी पदार्थांवरच. मग बोला मुलगा होणार नाहीं तर मग काय होणार ?

**मालतीः**—देव करो आणि सासूबाईंना मुलगाच होवो. मी असं कां म्हणतें ? आहे कां ठाऊक ? ऐका तर—

### पद

**मुलगा पुल्लिंगी । न्हायाला । नेसली शालू हिरवा ॥**
**शालू पुल्लिंगी । वरि शोभे । शोभे ब्लाउझ बरवा ॥**
**ब्लाउझ पुल्लिंगी । केसांचा । बांधी बुचडा बरवा ॥**
**बुचडा पुल्लिंगी । डोईमध्यें । शोभे सुंदर मरवा ॥**
**मरवा पुल्लिंगी । आवडतो । नित्य बदामी हलवा ॥**
**हलवा पुल्लिंगी । रंजविते । वाजवुनियां पावा ॥**
**पावा पुल्लिंगी । करित असे । देवाजीचा धांवा ॥**
**धांवा पुल्लिंगी ॥**

**शारदाः**—बाई बाई बाई, काय तरी हें सुरेख गाणं ? इंदिराबाई ऐकलेत का तुमचे पुल्लिंगी डोहाळे ? पण मी म्हणतें, तुम्हाला काय काय आवडतं, तें तुम्हींच स्वतः सांगितलेलं बरं, लाज धरायचं कांहींच कारण नाहीं.

**सुलोचना**—अग पहिलटकरणीला एवढी लाज वाटतेच. मी माझ्या डोहाळ जेवणाच्या दिवशीं अगदीं स्तब्धच बसलें होतें. पण इंदिराबाईंना कांहीं लाजायला नको.

**इंदिराः**—छे मी नाहीं बाई सांगत !

**सर्वः**—अहो बाईसाहेब सांगा कीं.

**बायजाः**—अहो बाईसाहेब सांगा सांगा कीं !

**इंदिराः**—तुम्हीं कांहीं मला तशा सोडणार नाहीं, तर मग सांगतेंच हं—ऐका तर—

## पद

**मज डोहाळे । डोहाळे काय पुसतां । अजि हट्ट कांग धरितां ॥**
**सुत व्हावा मला । व्हावा गुणवंत । शोभवील कुला कुलवंत ॥**
**यशोदेसी जसा जसा यशवंत । व्हावा पुत्र भाग्यवंत ॥ १ ॥**
**मज आवडतो । फणस नी ऊस । काकडी नको दृष्टीस ।**
**गुलाब केवडा । चाफावासास । जाईजुई नको ग नजरेस ॥२॥**
**हा बुट्टयांचा त्यालें शालु हिरवा । ब्लाउझ शोभे वरि बरवा**
**प्रियभक्तीनें नंदलाल अळवा । आवड मजला सुत व्हावा ॥३॥**

**शारदाः**—इंदीराबाई शाबास ! कवन तर चांगलं रचलंत ! स्वारींनी तर नाहींना. दिलं करून हें कवन ?

**सावित्रीः**—वसंतरावांनींच करून दिलं असेल हें कवन !

**इंदिराः**—नाहीं बरं हें गाणं माझ्या सूनबाईनं केलं आहे.

**सर्व**—सूनबाई कोण ?

**इंदिराः**—माझा पुतण्या मोहन, त्याची ही बायको मालती, हिनंच करून दिलं आहे हें गाण !

**सावित्री**—असं कां ? सुरेख झालं आहे हो !

**मालतीः**—मीच केलं आहे हो हे गाणं !

**बायजा**—बरं बाईसाहेब, ह्या तुमच्या समोर ठेवलेल्या पेल्यांपैकीं एका पेल्या-वरचं झांकण काढा, म्हणजे तुमच्या नशीबीं काय आहे, तें तरी आम्हांला समजेल, हं, काढा पाहूं झांकण !

**इंदिराः**—काढू कां झांकण ?

**पोपईः**—काढा, काढा, बाईसाहेब काढा कीं झांकण.

**मालतीः**—हं सासूबाई काढा झांकण, पण मी सांगितल्या प्रमाणें करा हं.

**इंदिराः**—हं तर मग हे घ्या ( दोन्ही पेल्यावरचीं झांकणं काढते. )

**सुलोचनाः**—अहो हे काय दोन्ही पेले उघडलेत कीं !

**इंदिराः**—आतां जें झालं तें झालं !

**सुलोचनाः**—म्हणजे मुलगा मुलीचं जुळं होणार कीं काय ह्यांना !

  

**इंदिराः**—अगबाई मला एकदम जुळं होणार कीं काय ?

**शारदाः**—अहो होऊं द्या, देवाचं देणं त्यांतच आनंद मानला पाहिजे.

**बायजाः**—आणि होईना का, मला सुद्धां एकदां जुळं झालं होतं.

**सुलोचनाः**—पण त्या जुळ्यात एखादी मुलगी होती कीं काय ?

**बायजाः**—नाहीं. दोन्ही मुलगेच होते आणि इंदिराबाईनाही पण दोन्ही मुलगेच होणार.

**सावित्रीः**—अहो पण एका पेल्यांत बरफी आणि दुसऱ्यांत पेढा आहे ना ? तेव्हां इंदिराबांईना एक मुलगा व एक मुलगी अस्सं जुळं होणार.

**अजिऱ्याः**—( प्रवेशून ) अं ! बाइसाहेबांना एक मुलगा आणि एक मुलगी अस्सं जुळं होणार आहे ? मग पोपई माझी अर्धांगी होणार कीं अर्धी ?

( इतक्यांत मोहन बुरखा घेतलेला पिस्तुल घेऊन येतो व इंदिरेवर रोखतो. )

**मोहनः**—बाईसाहेब दत्तक घेतां का प्राणास मुकतां ?

**मालतीः**—( पिस्तुल काढून घेते व मोहनवरच रोखते ) काय पतिराज काय विचार होता ?

**मोहन**—कोण मालती ? शरण ! शरण ! !

( पडदा पडतो. )

---

अं. ३ रा प्र. २




मोहन छुरी

# अंक तिसरा

## प्रवेश १ ला

( दिवाणखान्याची एक बाजू )

**वसंतरावः**—पिलोबा ए पिलोबा, कुठं गेला आहे हा गद्धा कोण जाणें. असा कारकून भेटला आहे कीं अगदीं अर्क आहे. पिलोबा—

**पिलोबाः**—अहो काय झालं रावसाहेब ! वायु झाला कीं काय ?

**वसंतरावः**—अरे बेअकली, तुझी अक्कल गेली तरी कुठें ? अरे होतास कुठें ?

**अंजिऱ्याः**—रावसाहेब हे फिदा अल्लीकडून बिल आलं आहे.

**वसंतरावः**—( पत्र वाचतो ) हें काय ? हें कसचं बिल. एक ढकलगाडी एक ट्रायसिकल, कुणाकरतां रे या जिनसा ?

**पिलोबाः**—आपल्या चिरंजीव सुंदर वसंतरावांकरतां.

**वसंतरावः**—पिलोबा, अरे अजून मुलाला ठिकाणा नाहीं आणि ह्या जिनसा कशाला मागवल्यास ?

**अंजिऱ्याः**—बरं मागवल्या त्या मागवल्या पण त्या देखील स्त्रीलिंगी जिनसा—पहा ना—ट्रायसिकल, ढकल गाडी, पेटी, मोटरसायकल.

**वसंतरावः**—या जिनसा आतां परत पाठवून दे आणि बारशाच्या निमंत्रण-पत्रिका पोष्टाच्या पेटींत टाकल्यास कीं नाहीं ?

**पिलोबाः**—नाहीं टाकल्या पेटींत, पेटींत कशाला टाकूं. पेटीला बाहेरून कुलूप लावलेलं होतं.

**वसंतरावः**—अरे मग पत्रिका कुठं सोडल्यास ?

**पिलोबाः**—पत्रिका पोष्ट ऑफिसांत नेऊन पोष्ट मास्तराजवळ दिल्या.

**वसंतरावः**—पेटीला कुलूप होतं म्हणून काय झालं ! पेटीच्या भोंकांतून पत्रिका सोडायच्या होत्यास. बरं असो.

**अंजिऱ्याः**—बाहेर हनुमान मास्तर आले आहेत आणि सुंदररावांच्या शिकव-णीचा ८ वा महिना भरला त्याची फी मागताहेत.

**वसंतराव:**—अहो पिलोबा, पोराचा अवतार सुद्धां झाला नाहीं आणि मग त्यांनीं शिकवलं तरी कुणाला ?

**पिलोबा:**—शिकवायला कशाला पाहिजे ? रावसाहेब एक अक्षर देखील न शिकवितां मास्तर शिकवणीचे पैसे मागूं शकतो. अहो रोज ते इथं तासभर येऊन बसत होते ना ?

**वसंतराव:**—बरं आहे. देऊन टाक दहा रुपये त्याला.

**अंजिऱ्या:**—ठीक आहे. ( जातो. )

**वसंतराव:**—पिलोबा–आणखी कोणतीं कामं केलींस बाबा ?

**पिलोबा:**—बारश्याच्या उत्सवांत गवयाचें गाणं करायचं ठरल्यामुळं मी कलकत्याच्या रसगुल्लाखान गवय्याला तारेनं वाटखर्चीबद्दल १०० रुपये सुद्धां पाठविले आहेत.

**वसंतराव:**—फार छान केलंस.

**पिलोबा:**—शिवाय बारशाच्या पत्रिका साऱ्या इष्टमित्राना वेळेवर पोहोंचणार नाहींत म्हणून " अंधार " वर्तमान पत्रांत बारशाची जाहिरातसुद्धां छापून टाकली आहे. ही पहा ती जाहिरात !

**वसंतराव:**—गद्धया हें रे काय ? आनंदाची बखर. गाढवा–बखर कीं खबर.

**पिलोबा:**—दोन्ही एकच, बखर म्हणजे खबर, कारण दोन्ही शब्दांत अक्षर तींच आहेत, खबर बद्दल बखर छापलं गेलं, ही खिळे जुळवणाराची चूक असेल, माझी चूक नाहीं, शिवाय बखर तरी लोकांनीं वाचावयाचीच असते. व खबर सुद्धां लोकच वाचतात.

**वसंतराव:**—शंख आहेस झालं !

**पिलोबा:**—जाहिरात तर पहा कशी लिहिली आहे ती.

**वसंतराव:**—( पहातो. ) तुझ्या अकलेचं प्रदर्शन पाहातो. ( मोठ्यानं वाचतो. ) अलमटोल्याचे प्रसिद्ध जहागिरदार रावसाहेब वसंतराव चुरमुरे हे अंदाजें सिंगल किंवा डबल मार्च रोजीं किंवा बाईसाहेबांचे दिवस बरोबर मोजले नसल्यास एप्रिल फूलाचे सुमारास बाळंत होऊन त्यांना मुलगाच होईल. तर ज्यांना मुलगेच असतील अशा मित्र इष्टांनीं—हें रे काय ? मित्र इष्ट कीं इष्ट मित्र ?

**पिलोबा:**—दोन्ही एकच, दोहोंत अक्षर अगदीं एकच.

**वसंतराव**:—पण कायरे गध्या—वसंतराव बाळंत होऊन त्यांना मुलगा होणार असं रे काय लिहिलंस ?

**पिलोबा**:—काय हरकत आहे ? बाईसाहेब बाळंत झाल्या तरी मुलगा तुम्हांलाच होणार ना ? अहो लोकांना काय ? कोणीही बाळंत होवो, बारशाला हजर राहिलं म्हणजे झालं.

**वसंतराव**:—बरं पुढें काय लिहिलंस ? मित्रइष्टांनीं बारशाच्या महोत्सवासाठीं सहकुटुंब सहपरिवारासह हजर राहून उत्सव साजरा करावा.

सहीः—पिलोबा खडतरे खाजगी कारभारी

टू रावसाहेब वसंत चुरमुरे.

राहणार आलमटोला. जिल्हा—टमटम.

गध्या, जहागीरदारीणबाई बाळंत होणार आहेत असं कां नाहीं छापलंस ?

**पिलोबा**:—म्हणजे ! अहो बाईसाहेबांना छापखान्यांत खेचूं कीं काय ? वा—रावसाहेब, थोरामोठ्यांच्या बायकाच काय—पण त्यांचीं नांवं सुद्धां छापखान्याच्या शिळेवर जातां कामा नयेत, म्हणून तर मी रावसाहेब बाळंत होणार म्हणून छापलं. ( हंसतो )

**वसंतराव**:—अरे दीडशहाणा आहेस झालं. बरं निमंत्रणं तरी कुणा कुणाला पाठविलींस ?

**पिलोबा**:—ही पहा निमंत्रणाची यादी—ऐका नंबर १.

श्रीगणपती महादेव कैलासवासी,

रहाणार कैलासपर्वत जिल्हा—स्वर्गलोक.

**वसंतराव**:—म्हणजे गणपतीला सुद्धां कां बोलावलास ? आणि गणपतीचं आडनांव काय लिहिलंस कैलासवासी ? हें रे कां त्याचं आडनांव ?

**पिलोबा**:—तो कैलासांत राहतो म्हणून मी स्वानंदवासी आडनांव लिहिलं. प्रयागमधें राहणाराचं नांव जसं प्रयागवासी तसं हे कैलासवासी प्रत्येक कार्यारंभी गणपतीचं अधिष्ठान पाहिजे. म्हणून पहिलं आमंत्रण गणपती महादेव कैलासवासी यांना केलं यांत कुठं चुकलं बुवा !

**वसंतराव**:—बरं पुढं वाच.

**पिलोबा**:—ऐका नंबर २

नारायण रंगुताई वकील राहाणार चिमणपूर.

**वसंतराव**:—अरे गध्या ? नारायण रंगुताई काय लिहिलंस ?

**पिलोबाः**—कां बरं–बरोबर लिहिलं. ही माझी समाज सुधारणेची सुधारकी दृष्टि आहे. बायका व पुरुष यांचे हक्क समसमान आहेत ना ? मग बायकांनीच तेवढं आपल्या पुढं नवऱ्याचं नांव लावावं असं काय म्हणून असावं ? नवऱ्यांच्या पुढं बायकांचं नांव लावण्याची माझी नवी सुधारणा आहे. या सुधारणे प्रमाणं तुमचं नांव वसंतराव इंदिराबाई असं होईल.

**वसंतरावः**—दीड शहाणा आहेस झालं ?

**पिलोबाः**—थँक्यू रावसाहेब. इतका वेळ तुम्ही मला गाढव गद्धा पाजी मूर्ख म्हणत राहिलांत–पण मी आतां नुसतां शहाणा नसून दीड शहाणा ठरलों. म्हणून थँक्यू रावसाहेब, अहो नाना फडणवीस तर अर्धा शहाणा होता, पण मी दीड शहाणा. आता पुढं ऐका नंबर ३

हरबा शंकर निनावे

**वसंतरावः**—निनावे–हें रे काय ?

**पिलोबाः**—त्याचं आडनांव आठवलं नाहीं म्हणून निनावे लिहिलं.

**वसंतरावः**—अरे हरबा शंकरचं आडनांवच आठवले आहे आणि आठवलं कसं नाहीं. गद्धा आहेस झालं.

**पिलोबाः**—पुन्हां दीड शहाण्याचा गद्धा झालों अं ! बरं पुढं ऐका, नंबर ४

पोथी शास्त्री पुराण शास्त्री राममंदिरे.

**वसंतरावः**—हें रे काय ?

**पिलोबाः**—अहो त्याचंही नांव आठवेना म्हणून तसं नांव लिहिलं, मग करतां कसं ? बाकी निमंत्रण खात्रीनं पोचेल. पुढें ऐका नंबर ५

गरोदर लंबोदर पेटीवाले

सावकार रद्दीपूर.

**वसंतरावः**—अरे हें रे काय ? त्या घेला शेटचं नांव गरोदर लिहून टाकलंस कीं काय ?

**पिलोबाः**—मग काय करूं ? त्या शेटजींचं कांहीं केल्या नांव आठवेना पण त्याचं गरगरीत पोट मात्र चटकन आठवलं. त्याचा बाप ढेरपोट्याच होता. शिवाय रोज तो पैशाच्या पेटीसमोर बसतो. म्हणून घेला शेटच नांव गरोदर लंबोदर पेटीवाले असं दिलं दडपून झालं. अहो गरगरीत उदर ज्याचं तो गरोदर. हा कर्मधारय समास.

**वसंतरावः**—वारे कांद्या, चांगला समास सोडविलास. असा समास सोड-

विल्याबद्दल मास्तरनं तुझ्या आंगचं मांस काढलं असतं. अक्कलवान आहेस. बरं पण कायरे–या साऱ्या पत्रिका त्यांना पोहचतील कां ?

**पिलोबाः**—पोहोचतील ! न पोहोंचल्या तर डबल पैसे देऊन परत घेऊं. शिवाय पत्ते बरोबर नसलेल्या पाकिटावरचीं तिकिटें हळूच काढून घेऊन पाकीट फाडून फेकून देण्याबद्दलचा मी पोष्टमनशीं गुप्त करार करून ठेवला आहे. त्यामुळें तशीं न पोहोंचणारीं पत्रं परत येण्याची भीतीच उरली नाहीं रावसाहेब. पत्रं एकतर पोहोंचतील किंवा फाडलीं जातील, परत येण्याची धास्तीच नको.

**वसंतरावः**—नमस्कार असो तुझ्या कारवाईला.

**पोपईः**—( पळत येते ) रावसाहेब–धांवा, पळा, बाईसाहेब घाबरल्या. अहो त्या जमिनीवर गडबडा लोळूं लागल्या. आतां कसं बाई करूं ?

**पिलोबाः**—घटका भरली वाटतं.

**पोपईः**—सारख्या जमिनीवर लोळत आहेत आणि तोंडानं अग आई ग म्हणत आहेत.

**वसंतरावः**—अररर–जमिनीवर कशाला लोळते–स्त्रीलिंगी जमिनीवर लोळून फटकन् मुलगी होईल ना ? अग तिला पलंगावर तरी लोळ म्हणावं. आणि तोंडानं अग आई ग न म्हणतां अरे बापरे म्हण म्हणावं. अग आई ग म्हणून मुलगी होईल ना ?

**पोपईः**—डोळे पांढरे करून प्राण कासावीस होऊं लागला आहे त्यांचा.

**वसंतरावः**—होऊं दे. प्राण आणि डोळे पुल्लिंगी आहेत. तिला खात्रीनं मुलगाच होईल. पोपई धाव, यावेळीं डॉक्टर पेननाईफ नाहींतर छुरी यांना तरी घेऊन ये जा. ( जातात. )

---

## प्रवेश २ रा

( मोहनचें घर )

**मोहनः**—मालती, त्या दिवशीं वसंतराव व इंदिराकाकू यांनीं आमचे अपराध पोटांत घालून, पोलिसच्या तावडींतून सुटका केली ती केवळ तुझ्याकडे पाहून केली हें मी जाणून आहें. पण मी तरी काय करूं ? द्रव्यमोहाला बळी पडून मी पुन्हां पुन्हां दुष्कृत्य करण्याला प्रवृत्त होत आहें याची मला क्षमा कर.

**मालती:**—म्हणजे ? अजून सासूबाईना त्रास देण्याचं वेड डोक्यांत आहेच वाटतं. अहो त्यांना जर मुलगी झाली तर तुम्हांला दत्तक घेऊन सारी इस्टेट मिळणारच आहे मग उगीचच कां दुष्कृत्याचं पाप शिरावर घेतां ? त्यांच्या वचनांत वागाल तर तुमचं कल्याण होईल. या दुष्कृत्याचं प्रायश्चित्त म्हणून मामंजी तर आजारी पडले आणि तुम्हीं कांहीं अजून ताळ्यावर येत नाहीं. नेहमी ती मिस् छुरी–तिच्याशीं कसल्या गोष्टी करीत बसतां ? माझ्यापासून लपवून ठेवीत जाऊं नका ?

**मोहन:**—अग मी तर आतां कांहीं करत नाहीं. देवावर हवाला ठेऊन अगदीं स्वस्थ बसलों आहें. दोन वेळां आमचे डाव फसले. पण लाडके पुन्हां एकवार डाव टाकून पहावा असं फार फार मनांत येतं, तुझी परवानगी असेल तर–मिस् छुरीला सांगून—

**मालती:**—काय करणार—? पोराच्या गळ्याला नख लावणार कीं सासूबाईचा प्राण घेणार ? बोला तुम्ही शुद्धीवर आहांत की चकला आहांत. अहो त्या कवटाळणीच्या विषयमोहात गुरफटून घरादाराचं वाटोळं कां म्हणून करतां ? अशी अवदसा कशी आठवली तुम्हाला. काय ! मी म्हणते इकडे लक्ष नाहीं वाटतं ? तुमच्या आग्रहावरून मी पुन्हां या तुमच्या घरांत पाऊल ठेवलं बरं नाहीं तर त्याच दिवशीं मी तुमचा प्राण घेऊन मी सुद्धां या जगांतून काळं केलं असतं. म्हणून म्हणतें आपण गरीबींत राहून मीठ भाकरी खाऊन आनंदानं दिवस कंठू पण ती नसती कुलंगडी नी कारस्थानं नकोत बरं आपल्याला. काय नाहीं का उजेड पडत ?

## पद

**पुण्याचा मार्ग बरवा ना धन मोहे मोहवा ॥ धृ ॥**
**जो भव भय दुस्तरवारी । करि संसारीं सुखकारी ।**
**व्हा त्याचे भक्त पुजारी । प्रभुचरण आळवा ॥ १ ॥**

**मोहन:**—नाहीं. अग पण हो आंत—मिस् छुरी आली. ( येते )

**मालती:**—( स्वगत ) ही कवटाळीण काय म्हणते तें तर ऐकलंच पाहिजे. ( उघड ) मी म्हटलं सासूबाईची तबेत पाहून येऊं कां ?

**मोहन:**—हो हो, जा जा, तब्येत पाहून ये—

**मालती:**—येते बरं—( जाते—आड उभी राहते. )

**मोहनः**—प्यारी छुरी—ती सासूबाईकडे गेली. आतां खुशाल इथं बैस. ये अशी अगदीं जवळ ये. तुझ्यावांचून मला क्षणभरसुद्धां चैन पडत नाहीं, हा बघ तुझ्या संबंधीचा लेख लिहून त्याच्या दोन नकला सुद्धां मी करून ठेवल्या आहेत. वाचून तर पहा. ( दाखवतो. )

**छुरीः**—( वाचून पहाते ) ह्या लेखाप्रमाणं बाईसाहेबांच्या मुलाचा जन्म होतांच त्याचा गळा पिचून त्याला यमसदनाला पाठवून द्यायचं हेंच ना माझं काम ? ही पहा या लेखावर सही करतें. दुसरी नक्कल द्या (दुसरी नक्कल घेऊन त्यावर सही करते व देते. )

**मोहनः**—लेख बॅगमध्यें ठेव. ( ती तसें करते. )

—पडद्यांत—

( **बंडोबाः**—अरे मोहन, अग ए मालती मला कोणी एक घोट पाणी पाजारे ) अग, बाबांचा ताप भडकला वाटतं ? चल पाहूं त्यांची तब्येत तरी पाहून घेऊं ( दोघे जातात. )

**मालतीः**—अगबाई कसला आहे बरं हा कागद ! ( वाचते ) अग कवटाळणी पोराच्या नरडीला नख लावून तुला हे आपली पट्टराणी करणार अं ? बरा सांपडला हा पुरावा ( कागद घेते. ) आतां ही सटवी सासूबाईना हॉस्पिटल-मध्यें नेऊन आपला डाव पुरा करील. पण मी हिच्यापूर्वीच जाऊन सटवीचा बंदोबस्तच करून ठेवतें. ( कागद घेऊन जाते. ) ( मोहन व छुरी येतात. )

**मोहनः**—काय ग बाबा जगतील असं वाटतं कां तुला ?

**छुरीः**—मरेना का तो थेरडा. मला काय करायचं त्याच्याशीं ? तुम्ही सुखाचे म्हणजे मिळवली. माझा प्रेम विसावा मला मिळाला म्हणजे माझ्या जिवाचं सार्थक झालं. प्रेमी जिवा—

**मोहनः**—प्यारी, आत्तां येवढं काम फत्ते कर म्हणजे मी तुझा नी तूं माझी.

---

## प्रवेश ३ रा

( रस्ता )

**रसगुल्लाखांः**—क्यौं बे डग्गाखान लडका मोहल्ला कहां है ?

**डग्गाखांः**—उस्तादजी उस लडका मोहल्लेके बारेमें आप जितने वाकिफ है उतनाही मै हूं याने मुझे कुछभी खबर नहीं.

**रसगुल्ला**:—तो फिर ऐसा करें–मैं रसगुल्ला और तू डग्गाखां–रस्तेसे गाते गाते जाएगे. वो भी वसंतराव चुरमुरेके मकान परसे जाएंगे तो वो अपना आवाज सुनकर आपनेको अंदर बुलालेंगे.

**डग्गाखां**:—मगर उस्तादजी अपने गानेमें अपना नाम रहनेका ठिकाना वगैरा वगैरा सब कुछ आना चाहिये.

**रसगुल्ला**:—इसमें तो हम बडे वाकी है. गाना तयार करके वो किस तऱ्हे गाना ये हमें याद है. बजाव डग्गा.

**पद**

**सुनो सुनो मेरा नाम रसगुल्ला । कलकत्तेका ये रहनेवाला बढिया हू मैं गानेवाला ॥ धृ. ॥ मेरी रागदारी है भारी दिल बहारी । बजवैया मेरा मिया डग्गाखान ॥ १ ॥**

( अंजिऱ्या व नवग्रहशास्त्री येतात. )

**अंजिऱ्या**:—शास्त्रिबुवा हें पाहिलंत कां सांग. हा कोणी लंब्या दाढीचा परदेशी गवई दिसतोय.

**नवग्रह**:—अरे अंजिऱ्या अरे हाच रे तो कलकत्त्याचा रसगुल्लाखां. लेकाचं तोंड पहा कसं दाढी मिशीन दादरा बांधलेल्या रायत्याच्या बरणी प्रमाणं कसं खुलून दिसत आहे तें पहा. त्याच्या या तोंडावरच्या केसांच्या जंगलांत ह्याचं तोंड–नाक–कान डोळे अगदी कसे गडप होऊन गेलेले आहेत.

**रसगुल्ला**:—सलाम आलेकुम्–

**डग्गाखां**:—आदाब अर्ज–

**नवग्रह**:—काय हो आपण गवय्ये बजवय्ये कुणीकडे निघालांत ?

**रसगुल्ला**:—हमें मुलगा मोहल्लेमें वसंतराव चुरमुरे के यहा गानेके वास्ते जाना है.

**अंजिऱ्या**:—तर मग असं करा असे नीट सरळ जाऊन पुन्हां वांकडे वळून पुन्हां सरळ जा म्हणजे नेमके मुलगा मोहल्यांत जाल. नाहींतर असंच कराना. आमच्या बरोबर या. आम्हीच तुम्हाला घर दाखवतों.

---

## प्रवेश ४ था

( दिवाणखाना )

**इंदिराः**—सुनबाई असं असेल तर मी नाहीं ग बाई इस्पितळांत किंवा सूतिकागृहांत जायची.

**मालतीः**—थांबा. इतक्यांत मिस् छुरी इथं येईलच. ( पोपई येते. )

**पोपईः**—बाईसाहेब नर्स मिस् छुरी आली आहे. तिला आंत सोडूं का ?

**इंदिराः**—सोड, येऊं दे तिला. पण काय ग अजून ती कुवारीच आहे ना ? बघ नाहींतर मला मुलगी होईल.

**पोपईः**—तिचं लग्न अजून झालं नाहीं बाईसाहेब. ( जाते. ) ( छुरी येते )

**छुरीः**—बाईसाहेब चला इस्पितळांत तुमच्या बाळंतपणाची सर्व चोख व्यवस्था ठेऊन मी इकडे आलें आहे. त्वरा करा वेळ गमावूं नका.

**मालतीः**—सासूबाईंच्या मनांतून इस्पितळांत यायचं नाहीं.

**छुरीः**—तें कां बरं ! यांच्या बाळंतपणाची हॉस्पिटलमध्यें चोख व्यवस्था ठेऊन मी इकडे आलें आहे. आणि मग असा एकाएकीं ठरलेला बेत कसा फिरला ?

**इंदिराः**—सटवे, कवटाळणी.

**छुरीः**—हा काय गहजब. मी काय केलं ? मी काय केलं ?

**इंदिराः**—पापिणी, मला इस्पितळांत नेऊन माझ्या जन्मलेल्या बाळाच्या गळ्याला तूं नख लावणार आहेस ना ? कवटाळणी कुठं भोगशील या पापाचीं फळं ?

**छुरीः**—इंदिराबाई काय बडबडतां आम्ही नर्सेस असलीं नीच मांगाचीं कामं केव्हांही करीत नाहीं. तुमच्या मनांत हे कोणी भरवून दिलं ?

**मालतीः**—करून सवरून दिमाखानं कुणी सांगितलं म्हणून विचारायला लाज नाहीं वाटत ?

**छुरीः**—या मालतीबाईनं तुमच्या कानांत विषारी फूत्कार फुंकले आहेत. हिच्यावर विश्वास ठेऊं नका. ही अट्टल लबाड आहे. मोहनरावानं हिच्या ह्याच दुर्गुणाबद्दल घरांतून घालवून दिली होती. म्हणून म्हणतें त्वरा करा वेळ गमावूं नका. बाहेर मोटार तयार आहे.

**मालतीः**—अग राक्षसणी, नीच कृत्य करून तूं मोहनरावांची मोहना राणी होण्याचं ठरवलं आहे ना ? बोल, खरं सांग.

**छुरीः**—खबरदार मालती. माझ्यासारख्या सद्गुणी नर्सवर भलतेच आरोप

लादशील तर पोलिसकडून तुझा बंदोबस्त करावा लागेल. बाईसाहेबांना दवाखान्यांत नेण्याबद्दल तूं हरकत केलीस म्हणून पुढें होणाऱ्या बऱ्यावाईट प्रकाराबद्दल तूं जबाबदार धरली जाशील.

**इंदिरा**:—मी माझा वाडा सोडून कुठंही जाणार नाहीं. माझ्या बाळंतपणाची सर्व सोय मी इथच करीन. तूं चालती हो इथून. मी बाळूबाई भिड् वाईफला बोलावलं आहे.

**छुरी**:—थांब मालती मी तुला कोतवालीचीच हवा दाखवतें.

**फौजदार**:—( येतो ) काय भानगड आहे ?

**छुरी**:—फौजदार साहेब या मालतीला पकडा. ही आमच्या कृत्याच्या आड येत आहे.

**फौजदार**:—मालती तुझं काय म्हणणं आहे.

**मालती**:—तुम्हाला मिस् छुरीला गिरिफतार करण्यासाठीं मुद्दाम बोलावून आणलं आहे. हिला अगोदर हातकडी टाका.

**अंजिऱ्या**:—( येतो ) खबरदार–स्त्रीलिंगी हातकडी मुळींच घालूं देणार नाहीं. कोलदंडा आडकवा हिच्या पायांत–मी आणतों हा कोलदंडा (जातो.)

**छुरी**:—अहो पण मी काय केलं–मी काय केलं ?

**मालती**:—मी काय केलं ! कवटाळणी तुझ्या पाकिटांत कसला लेख आहे !

**फौजदार**:—नर्स हीच आहे कां तुझी बॅग–त्यांत कसला लेख आहे पाहूं !

**छुरी**:—कुठं आहे यांत कसलाही लेख नाहीं.

**मालती**:—नाहीं. ( जवळचा कागद काढून ) फौजदार साहेब ह्या कागदाची हिच्या बॅगमध्यें नक्कल आहे. पाहून घ्या.

**फौजदार**:—ओ–लो ! नर्स हें काय केलंस. तूं या असल्या कृत्यानं आपल्या पवित्र धंद्याला काळोखी फासलीस.

**मालती**:—दुसऱ्याचा जीव वाचविण्याचं पुण्यकर्म करण्याचा विडा उचलणाऱ्या नर्स डॉक्टरांनीं जर लोकांचे गळे कापण्यास सुरवात केली तर ते राक्षसा पेक्षांही नीच आहेत असंच म्हणावं लागतं–फौजदार साहेब ही कवटाळीण बाईसाहेबांच्या पोराच्या गळ्याला नख लावणार होती हें स्पष्ट आहे कीं नाहीं या कागदांत ? बोला !

**फौजदार**:—हें या कागदावरून स्पष्ट दिसतं आहे.

**मालती**:—तर मग बाईसाहेब बाळंत होईपर्यंत ही नर्स, मोहनराव, आणि बंडोबा यांना तुम्ही कोतवालींत डांबून ठेवावं असा माझा अर्ज आहे.

इंदिराः—अग सटवे, माझ्या बाळाच्या नरडीला नख लावणार होतीस नाहीं आणि मानभावीपणानं मला म्हणालीस चलतांना इस्पितळांत–तिथं सर्व व्यवस्था आहे. हीच कां व्यवस्था आहे तिथं ?

फौजदारः—बाईसाहेब तुम्ही बिलकुल काळजी करूं नका. मी या प्रकरणाचा पूर्ण बंदोबस्त करतों.

अंजिऱ्याः—फौजदारसाहेब, या स्त्रीलिंगी नर्सचा पुल्लिंगी बंदोबस्त जरूर करा.

छुरीः—फौजदारसाहेब मला वाचवा हो वाचवा.

मालतीः—मोहनरावांची मोहनाराणी चल हो बाहेर नीघ.

छुरीः—हाय हाय आतां कुठली इस्टेट नि कुठलं काय ?

( फौजदार छुरीला नेतो. )

वसंतरावः—( येऊन शास्त्रीबुवांस ) काय शास्त्रीबुवा मुलगा होण्याला आतां कितीसा अवधी आहे.

नवग्रहः—रावसाहेब मुलगा होण्याला आतां सारा दोन तासांचा अवधी आहे. त्वरा करा, बाळंतपणाची सर्व सोय लावा.

मालतीः—आमची सर्व तयारी आहे. तुम्ही पुरुषांनीं आतां इथं राहूं नये.

अंजिऱ्याः—चला रावसाहेब. आतां पुल्लिंगी पुरुषांचं इथं काम नाहीं.

---

## प्रवेश ५ वा

( रस्ता. )

नवग्रहः—रावसाहेब आज एप्रिलची पहिली तारीख. युरोपांत याच दिवसाला एप्रिल फूलचा दिवस म्हणतात. रावसाहेब त्वरा करा. बाळंतपणाची सर्व सोय लावा.

### पद.

**हाचि समय शुभ खरा सावरा । झडकरि सारे धावा ॥ धृ० ॥**
**सुत मुख कमलातें देखायाला । भाग्य अधिक तर दिसत फार ॥१॥**

वसंतरावः—चला शास्त्रीबुवा चला. अंजिऱ्या दिवाणखाना सजव—आतां पै पाव्हणे जमतील. तो रसगुल्लाखान गवई कुठं आहे ? बोलवा साऱ्यांना. पिलोबा कुठं गेला ?

नवग्रहः—तो पाहुण्यांच्या आलेल्या तारा घेऊन स्टेशनवर गेला.

वसंतरावः—ठीक आहे. पाहुण्यांची उतरण्याची सोय लावा. चला, अंजिऱ्या पेढे किती बोलावलेस ?

**अंजिऱ्याः**—वीस मण.

**वसंतरावः**—तर मग जा. उत्सवाच्या उद्योगाला भिडा. अंजिऱ्या मुलगा झाल्याबरोबर बँड, ताशे, सनया, कर्णे, मोटारचे पोंगे यांचा आवाज सारखा झडूं द्या. तसंच लहानापासून थोरापर्यंत सर्वांनीं मुलगा मुलगा असं बेंबीच्या देठांपासून ओरडून माझा हा भव्य वाडा कानठळ्या बसेपर्यंत दणाणून सोडा. वाड्याभोंवतीं सारा गांव जमा करा. आणि मुलगा मुलगा अशी आरडाओरड करा. ( पडद्याकडे पाहून ) अहो—अरे ते पहा पाहुणेसुद्धां आले. कायरे ही गर्दी, अबबब, टांगे, शिग्राम, मोटारी नि फटफट्या यांनीं तर सडकेवर हैदोसदुल्ला मांडला आहे. हे पाहुणे कीं पाहुण्यांची वरात.

**अंजिऱ्याः**—वरात नव्हे, हा पाहुण्यांचा पुल्लिंगी तांडा आहे. पण काय हो या साऱ्यांची जेवणाची व्यवस्था काय करायची ?

**नवग्रहः**—आतां या धांदलींत कसची होते जेवणाची सोय. जवळचंच फराळाचं खा म्हणावं नाहींतर अंजिऱ्या असंच कां करेनास. एक पोतंभर चुरमुरे आणून दे साऱ्यांना चारून. आज ह्या चुरमुऱ्यांच्या घरांत सर्वांना चुरमुरेच फाकूं द्या. रावसाहेब, चला उद्योगाला लागा. हा पहा पाहुण्यांचा तांडा आलाच. अरे बापरे काय ही मुंग्यांची रांग ( सर्व जातात. )

( मोहन पळत सुटलेला व त्याच्या पाठीमागें फौजदार व शिपाई येतात )

**मोहनः**—आतां कुठं तोंड लपवूं. पोलिस फौजदार माझ्या मागं धावत आला. अरे कुणि तरी मला आश्रय द्या.

**फौजदारः**—मोहन, थांब पळतोस कुठं–मी तुला गिरीफतार केलं आहे. मिस् छुरी चतुर्भुज झाली. चल आतां कोतवालीकडं.

**मोहनः**—हाय हाय फौजदार साहेब मिस् छुरीनं माझा सर्वस्वी घात केला.

**बंडोबाः**—( येऊन ) अं काय पहातों मी हें ? कोण मोहन ? अरेरे पोरट्या काय केलंस हें ? त्या मोहक मैनेच्या भुलथापांना भुलून तूं कुलाला काळिमा कींरे फासलास. आतां इज्जतही गेली आणि इस्टेटही पण गेली.

( अंजिऱ्या येतो. )

**फौजदारः**—बंडोबा मी तुम्हालाही गिरिफतार केलं आहे. ( लेख दाखवतो )

**बंडोबाः**—अहो, पण मी ह्या तारखेला आजारी होतों. माझा ह्या लेखाशीं कांहीं एक संबंध नाहीं.

**फौजदारः**—अहो ह्या लेखाशीं नसेल पण या लेकाशीं तर संबंध आहे ना.

**बंडोबाः**—होय. आहे खरा.

**फौजदारः**—चला कोतवालींत !

**बंडोबाः**—अरेरे पोरट्या काय केलंस हें ?

**अंजिऱ्याः**—फौजदार साहेब बाईसाहेब बाळंत होईपर्यंत या सर्वांना कैद-खान्यांत डांबून ठेवावं असा माझा अर्ज आहे. ( जातात ) शेवटीं आमच्या मनासारखं झालं.

## पद

**कसें हित झालें ! पुण्य फळाला आजाचि आलें । आस-**
**मनीची नेत्र निमाले । प्रमुदित मन डोले । डोले ॥ १ ॥**

---

## प्रवेश ६ वा

( दिवाणखाना. )

**वसंतरावः**—पिलोबा २० मण पेढे मोजून आणलेस कीं नाहीं ?

**पिलोबाः**—मोजून आणले-तागडीचं माप पाहून मग मोजले साहेब.

**अंजिऱ्याः**—तागडीनं कशाला मोजलेत ? तराजूनं मोजायचे होते. पाहिलंत रावसाहेब ?

**वसंतरावः**—अरे तराजूनं कां नाहीं मोजलेस हे पेढे ?

**पिलोबाः**—अहो तागडी म्हणजेच तराजू, अन् तराजू म्हणजेच तागडी !

**वसंतरावः**—होहो, मग कांहीं हरकत नाहीं, हो पण सारे पेढेच आहेत ना ? नाहींतर मधेंच त्या हलवायानं मखलाशी करून बर्फी घुसडून दिली असेल !

**पिलोबाः**—छे छे, एकजात पुल्लिंगी पेढाच आहे. कारण खवा घोटण्यापासून मी तिथं बसलों होतों.

**वसंतरावः**—मग कांहीं हरकत नाहीं, काय शास्त्रीबुवा आतां मुलगा होण्याला किती अवकाश आहे ?

**नवग्रहः**—आतां फक्त अर्ध्या तासाचाच अवधी आहे. पंचांग जवळ घेऊन बसलोंच आहे, तुम्ही साऱ्या पाव्हण्यांना जागेवर बसवून गवय्याचं पुल्लिंगी रागाचं गाणं द्या सुरू करून !

**वसंतरावः**—ठीक आहे !

**नवग्रहः**—आणि पेढ्यांची तबकं भरून ठेवा, तसंच हार, तुरे, विडे, अगदीं जय्यत तयार ठेवा, मुलगा झाल्यावर गोंधळ उडेल, म्हणून अगोदर पदार्थ तयार ठेवा.

**वसंतरावः**—ठीक आहे, पिलोबा सर्व तयारी ठेव बरं का !

पिलोबा:—सर्व तयारी अगदीं जय्यत आहे पोपईला माजघरांत उभी केली आहे–मुलगा ट्याहं, ट्याहं, करूं लागला कीं तिनं एकदम येऊन बातमी द्यावी अशी व्यवस्था केली आहे.

वसंतराव:—ठीक आहे !

नवग्रह:—हं हं. आटपा, घटका भरत चालली !

वसंतराव:—काय ? घटका भरत चालली ! अरे पिलोबा, तो कलकत्त्याचा रसगुल्लाखान गवई कुठं आहे ?

पिलोबा:—ते बघा ते आलेच ! ( रसगुल्ला व डग्गाखान येतात. ) या या खांसाहेब या. बसा.

वसंतराव:—हां खांसाहेब, चला सुरू करा, गाणं सुरू करा !

रसगुल्ला:—अच्छा साब !

पद

**तेरी गादी सलामत रहो । तेरी लडकी सलामत रहो ॥**
**तेरी पगडी सलामत रहो ॥ तेरी बाडी सलामत रहो ॥ध्रु०॥**
**गादी, माडी, पगडी ॥ तेरी बेटी सलामत रहो ॥ १ ॥**

वसंतराव:—अरे ए रसगुल्लीच्या थांब, गाढवा हें स्त्रिलींगी गाणं कशाला म्हणतोस ? अरे फटकन मला मुलगी होईल ना ? म्हणे, गाडी, माडी, बाडी, पगडी, सारं इथून तिथून एक जात स्त्रिलींगी गाणं, पुल्लींगी गाणं म्हण !

रसगुल्ला:—ये पुल्लींग, स्त्रीलींग क्या है हम नहीं जानते !

उग्गाखान:—उस्तादजी वो बोलते है के लडकेका गाना बोलो !

रसगुल्ला:—ऐसा ? अच्छा तो लो सुनो ! ( सुरुवात करणार तोंच घेलाशेठ येतात.

पिलोबा:—या या घेलाशेठ, बसा असे या लोडाशीं बसा !

रसगुल्ला— पद

**तेरा लडका सलामत रहो । तेरा वाडा सलामत रहो ।**

वसंतराव:—थांबा, थांबा ! लोकहो, आतां क्षणार्धांत मला मुलगा होऊन जिकडे तिकडे अगदीं आनंदी आनंद उसळून जाईल, मुलगा झाल्याचं वर्तमान समजतांच तुम्ही साऱ्याजणांनीं मुलगा, मुलगा, मुलगा असा एकजात पुल्लिंगी टाहो फोडून सारा वाडा हादरून सोडा ! ओरडून ओरडून तुमचा घसा कोरडा पडला तरी हरकत नाहीं. त्याला पुन्हां ओलावा आणण्यासाठीं

तिकडे पेढ्याचे हारे तयार आहेत ! ओरडा तर–मुलगा, मुलगा, मुलगा !

**सर्वः**—मुलगा ! मुलगा !! मुलगा !!!

**वसंतरावः**—हं चल रसगुल्ला कर सुरू पुल्लींगी गाणं.

**रसगुल्ला—** **पद**

**तेरा लडका सलामत रहो । तेरा वाडा सलामत रहो**

**वसंतराव**—थांब थांब, लोकहो पुन्हां ओरडा मुलगा, मुलगा, मुलगा !

**सर्वः**—मुलगा ! मुलगा !! मुलगा !!!

**पोपईः**—( येऊन ) घात झाला ! घात झाला !! घात झाला !!!

**अंजिऱ्याः**—होऊं दे, होऊं दे, होऊं दे ! घात पुल्लींगी आहे !

**वसंतराव**;—काय झालं ? काय झालं ?

**पोपईः**—आतां काय सांगू माझं कपाळ ! अहो मुलगी झाली !

**नवग्रहः**— काय मुलगी झाली ? अगदीं झूट ! साफ झूट !! एकदम झूट !!!

**वसंतरावः**—तुझं डोंबल झूट ! अरे शास्त्राच्या कांद्या ! तुझं भविष्य झूट ! तुझे नवग्रह झूट, तूं झूट ! अरे नवग्रह शास्त्र्या भविष्याच्या आडव्या उभ्या रेघा ओढून, आज मला मुलीचा बाप बनवून "एप्रिल फूल" तूं मला ठरवलंस ! अरे रस गुल्लीच्या गादी, पगडी, लडकीचं स्त्रीलिंगी गाणं म्हणुन, मला मुलीचा बाप तूं बनवलंस ! पिलोबा, गध्या, मुलगी होण्याचा तूं मला शाप दिलास ! अंजीऱ्या त्या पोपईला घरांत ठेऊन मला मुलीचा बाप तूं बनवलंस ! लोकहो, तुम्ही मनापासून मुलगा, मुलगा ओरडला नाहींत म्हणून मला मुलीचा बाप व्हावं लागलं ! चला व्हा बाहेर, उठा, निघा ! ( सर्वांना हाकलून लावतो ) सारा गांव लेकाचा पेढे खायला जमला आहे, निघतां बाहेर कीं घालू पाठींत लाथा ! अंजीऱ्या दे हाकलून सगळ्यांना !

( अंजिऱ्या सर्वांना हांकलत हांकलत बाहेर जातो. )

अरे शास्त्र्याच्या कांद्या, गेली गेली माझी दहा लाखांची इस्टेट गेली !

**नवग्रहः**—तुमची इस्टेट जात नाहीं, हें मी अजून सांगतों !

**वसंतरावः**—आतां काय डोंबल सांगतां तुमचं ? ( अंजिऱ्या येतो )

**अंजिऱ्याः**—रावसाहेब ते हनुमान मास्तर बाहेर आले असून सुंदर वसंतांचा शिकवणीचा दहावा महिना भरल्याची फी मागत आहेत !

**वसंतरावः**—त्या बिन शेपटीच्या हनुमानाला सांग कीं, आलास तसा जातोस

कां गांवभर तुझी धिंड काढूं ? म्हणावं तूं स्त्रीलिंगी फी मागितलीस म्हणून तर मला मुलीचा बाप व्हावं लागलं.

**अंजिऱ्याः**—बरं आहे रावसाहेब ? ( जातो )

**वसंतरावः**—अरे शास्त्र्या आतां जगाला हें काळं तोंड कसं दाखवूं ? तो मोहन आणि तो बंड्या आतां मला देशोधडीला लावतील !

**अंजिऱ्याः**—पण रावसाहेब सध्यां तर त्यांना फौजदार साहेबांनी तुरुंगांत डांबून ठेवलं आहे ना ?

**पिलोबाः**—अरे अंजिऱ्या, आपले " आगलावे " सावकार आहेत ना ? त्यांनीं, जमानतीवर सोडवून घेतलं आहे.

**वसंतरावः**—होय ना ? बस तर आतां मी जिवंतच रहात नाहीं.

**पिलोबाः**—<br>**अंजिऱ्याः**— } हं हं रावसाहेब, मग आम्ही कोणाच्या तोंडाकडे पहायचं बरं ?

**वसंतरावः**—अरे चांडाळांनो, तुम्ही मला सुखानं मरूं सुद्धां देत नाहीं का ? माझी दहा लाखांची इस्टेट, त्या भिकारड्या मोहनला मिळणार आतां मीं जगून काय करूं ? आज मुलगा झाला असता तर दहा लाखांची इस्टेट शिल्लक राहीली असती, पण आतां काय त्याचं ! अरे बापरे, तें पहा तें त्रिकूट, यमदूत माझी दहा लाखांची इस्टेट हिरावून नेण्यासाठीं आलेच !

**बंडोबाः**—( मोहन छूरीसह येतो. ) काय रावसाहेब शेवटीं मुलीचेच बाप झालांत ना ? आतां तरी माझा शाप खरा ठरला ना ? पाजी माणसा बऱ्या बोलानं मोहनला दत्तक घे आणि दहा लाखांचा धनी कर म्हटलं, पण तें तुला रुचलं नाहीं. आतां तोच हा भिकारडा मोहन आज दहा लाखांचा धनी झाला आहे ! बोल, तुझ्या त्या लेखाप्रमाणें दहा लाखांची इस्टेट मुकाट्यानं मोहनच्या पदरांत टाकतोस कीं करूं कोर्टदरबार. आतां मुकाट्यानं ह्या घराबाहेर काळं करतोस कीं तोंडाला डांबर फासून, तुझी, या मुलीच्या बापाची गांवभर धिंड काढूं ? काय ?

**वसंतरावः**—मधुकरराव, तुम्ही भाग्यवान आहांत, आमची ही बाळंत असे पर्यंत आम्हीं वाड्यांत रहातों, नंतर ही दहालाखांची इस्टेट तुमच्या पदरांत बांधून आम्हीं काशी यात्रेस निघून जाऊं. शास्त्र्यांच्या कांद्या, गेली गेली माझी दहा लाखांची इस्टेट गेली.

**नवग्रहः**—इस्टेट जात नाहीं, हें मीं अजून सांगतों.

**वसंतरावः**—आतां काय तुमचं डोंबल सांगतां ?

**नवग्रहः**—अहो बाईसाहेबांना पहिला मुलगाच झाला पाहिजे, माझं गणित

चुकलं कसं ? आजपर्यंत माझ्या गणितानं अशी गळचेपी कधींच केली नाहीं आणि आजच कसा असा दगा दिला ? पुन्हां गणित करून पहातो ! कां हे पंचांगच जुनं आहे ?

**मोहनः**—बाबा, प्रथम दहा लाखांची इस्टेट ताब्यांत द्या !

**छुरीः**—व्यर्थ बडबड नको आहे, दहा लाखांची इस्टेट ताब्यांत द्या !

**बंडोबाः**—वसंतराव, कुठं आहेत तिजोरीच्या किल्ल्या ?

**वसंतरावः**—शास्त्रीबुवा, द्या त्या तिजोरीच्या किल्ल्या.

**नवग्रहः**—बंडोबा, ह्या घ्या किल्ल्या, आणि कोपऱ्यांतील तिजोरींत दहा लाख रुपये ठेवले आहेत ते मोजून घ्या !

**बंडोबाः**—मोहन, छूरी, ( स्वतः बरोबर आणलेलीं कुलपं व किल्ल्या देऊन ) हीं कुलपं आणि किल्ल्या घ्या, आणि वाड्यांतल्या प्रत्येक खोलीला कुलूप ठोका, फक्त वहीनींनाच बारा दिवस ह्या वाड्यांत रहाण्याची परवानगी देण्यांत आली आहे. बाकीच्या या सर्व सोद्यांना आत्तांच्या आत्तां कमरेंत लाथा मारून घराबाहेर घालवून द्या.

**मोहनः**—चलारे ए सोद्यांनो ! व्हा बाहेर, ( अंजिऱ्या व पिलोबाला—बाहेर काढतो. )

**छुरीः**—( पोपईस ) ए, चल हो बाहेर ! ( तिला मारते व मोहन बरोबर आंत जाते. )

**पोपईः**—काय मारकी म्हस हाय व !

**बंडोबाः**—मुलीच्या अभागी बापा, रड रड आतां असाच जन्मभर रड बरं ( आंत जातो ) ( अंजिऱ्या व पिलोबा परत येतात. )

**अंजिऱ्याः**—चला रावसाहेब आतां गांवाबाहेरच्या स्त्रीलिंगी धर्मशाळेंत तरी जाऊन राहूं या ! तुम्हाला मुलगी झाली नी पोपईन पैज जिंकली ! आणि मी तिला अंतरलों आतां मला तरी इथं राहून काय करायचं आहे ! उठा.

**वसंतरावः**—चल बाबा ( जाऊं लागतात. )

**नवग्रहः**—अहो थांबा तुम्ही चाललांत कुठं ? तुमची इस्टेट जात नाहीं हें मी अजून सांगतों थोडे थांबा, मी पुन्हां गणित करून पहातों, बाईसाहेबांना पहिला मुलगाच झाला पाहिजे ! ( पंचांग पहातो. )

**वसंतरावः**—अंजिऱ्या, चल, आतां या शास्त्र्याला लागलं आहे वेड ! अहो आतां काय पहातां पंचांगांत ?

**नवग्रहः**—मुलगी कशी झाली हें पहातों आहें ! माझ्या गणितानं आजच कस दगा दिला ! दहा लाखांची इस्टेट इकडची तिकडे झाली.

**छुरीः**—( मालतीला मारीत आणते ) सटवे, कैदाशिणी, चल नीघ या घराबाहेर !

**मालतीः**—अहो नर्सबाई मला कां मारतां ?

**छुरीः**—नर्सबाई ! मला आतां मोहना राणी म्हण ! आतां या घराची सोळा आणे मालकीण मी आहें, मोहनची मोहनाराणी आतां मी आहें, तुझ्या नवऱ्याला आतां मी नाचवीन त्याप्रमाणं नाचलं पाहिजे, वेळप्रसंगी त्याला सुद्धां घराबाहेर करीन सोडणार नाहीं. चल निघ. ( मारते )

**वसंतरावः**—अहो नर्सबाई ! सोडा तिला ! माझ्या गरीब सुनेला आतां कां उगीच छळतां ? अहो तुम्हाला दहा लाख मिळाले, करा कीं मजा आतां, सोडा तिला, नका मारू काय जगाचा न्याय आहे पहा, " पापी माणसांच्या पापी कृत्यांनाच यशाचं फळ मिळतं " हा या कलीयुगाचा न्याय आहे. सोडा तिला !

**मोहनः**—( येतो ) काय मालती अजून इथंच ? प्यारी तिला धक्के मारून बाहेर घालवून दे.

**छुरीः**—चल नीघ ( मालतीला मारते, इतक्यांत पोपई येते. )

**पोपईः**—झाला, झाला, बाईसाहेबांना मुलगा झाला ! ( रावसाहेब व शास्त्रीबुवा एकमेकांना भेटतात, मोहन व छुरी घाबरून हें काय झालं म्हणून एकमेकांजवळ उभे राहतात, आंत बॅन्ड वाजूं लागतो. ) बाईसाहेबांना जुळं झालं, मुलगा झाला नी मुलगी झाली. आनंद करा ! आनंद करा !

**नवग्रहः**—दहा लाखांचा धनी जन्माला आला ! माझं गणित तंतोतंत खरं उतरलं.

**पिलोबाः**—शास्त्रीबुवा, तुमचं गणित सपशेल चुकलं, कारण पहिली मुलगी झाली !

**नवग्रहः**—नाहीं, माझं गणित तंतोतंत खरं झालं. कारण—

**पिलोबाः**—कसं तें पटवून द्या !

**नवग्रहः**—जुळ्यांत ज्याचा जन्म मागाहून होतो त्याचा गर्भसंभव अगोदरचा असतो हा आयुर्वेद शास्त्राचा सिद्धांत आहे. विचारून पहा हवं तर तज्ञांना ! रावसाहेब, या साऱ्यांचे दांत आतां घशांत कोंबा. कुठं आहे तो नीच बंडोबा. अंजिऱ्या पकड त्या मोहनला, पोपई, पकड त्या मिस छुरीची नरडी. मी त्या ब्यांबिसाला बाहेर काढतों. ( आंत जातो. ) ( अंजिऱ्या व पिलोबा मोहनला धरतात, छुरीला पोपई घेऊन येते. नवग्रह बंडोबाला धरून आणतात ) डांबीसा पाहिलास माझ्या ज्योतीषाचा प्रभाव,

दहा लाखांची इस्टेट पाहिजे होती नाहीं—का ? दहा लाखाच्या इस्टेटीसाठीं कितीरे धडपडलास ? कितीरे तडफडलास ? कितीरे फडफडलास ? बोल, त्या साध्वीला आणि या सत्पुरुषाला छळून तुला कायरे मिळालं ? अं ! पुत्र जन्माबरोबर तुझ्या तोंडाला काळं डांबर फासलं गेलं हेंही ठीक झालं !

**बंडोबाः**—( तोंडावरून हात फिरवून पहातो, तों बोटांस नाकावरचें काळें लागतें. ) त्या तिजोरीजवळच्या कोनाड्याचं काजळ लागलं माझ्या तोंडाला.

**वसंतरावः**—छान झालं, मला झालं जुळं, आणि लेका तुझं तोंड मात्र झालं काळं पिलोबा तो हंटर आण पाहूं.

**मालतीः**—नका नका मामंजी, माझ्या पतीदेवाला चाबकाचा मार देऊं नका. मनुष्य चुकीला पात्र असतो, दहा लाखांच्या इस्टेटीचा मोह आवरतां न आल्यामुळं, ह्यांच्या हातून हें असं पाप घडलं. तुम्ही श्रीमान् आहांत, भाग्यवान् आहांत, उदार अंतःकरणानं माझ्या पतीदेवाचा अपराध पोटांत घालून त्यांना सोडून द्या, आम्ही दोघं आपल्या चरणाची सेवा करून मीठ भाकरी खाऊन सुखांत राहूं

**वसंतरावः**—उठ, मालती उठ. तुझी विनंति मला मान्य केलीच पाहिजे, कारण तुझ्या सावधगिरीनच मला आज हे सुखाचे दिवस दिसले आहेत, तेव्हां तुला भिकारी न ठेवतां दहा लाखांच्या इस्टेटीपैकीं एक लाखाची इस्टेट आज मी तुझ्या नांवानं जाहीर करीत आहें.

**मोहनः**—धन्य आहे काकासाहेब तुमची धन्य आहे. मी चांडाळानं या मिस् छुरीच्या नादीं लागून तुमच्यावर वेळोवेळीं संकटं आणलीं, पण परमेश्वर सत्याचा वाली आहे हेंच खरं, काकासाहेब मला क्षमा करा ( पायां पडतो )

**वसंतरावः**—उठ, मोहन उठ, यापुढं मालतीच्या तंत्रानं वाग, तिला एक लाखाची इस्टेट दिली आहे, त्यांतून ती तुझं पालनपोषण करील.

**छुरीः**—आणि माझं कुणीच कां वाली नाहीं ? मालतीबाई, माझ्यावरही दया करा, या सद्गुणी नर्सवर दया करा !

**नवग्रहः**—चांडाळणी काळं कर इथून. पोपई दे हाकलून हिला.

**पोपईः**—चल निघ ( तिला धक्के मारीते. )

**अंजिऱ्याः**—माजली आहे पहा कशी रानबोक्यासारखी ! ही म्हणे सद्गुणी नर्स ( पोपई छुरीला बाहेर काढते. )

**छुरीः**—( जातां जातां ) आतां कुठली इस्टेट आणि कुठलं लग्न ?

**नवग्रहः**—आज सुंदर आणि लीला जन्मास आल्यामुळें वाड्यांत जिकडे तिकडे आनंदीआनंद झाला आहे, तरी मघाशीं हांकलून दिलेल्या त्या पाव्हण्यांना परत बोलावून, गाणंबजावणं, पेढे पानसुपारी वगैरे सर्व समारंभ पुन्हां होऊं द्या.

**वसंतरावः**—ठीक आहे, पिलोबा, बोलाव त्या सर्वांना. त्यांना सांग कीं, मुलगा मुलीचं जुळं झाल्यामुळं आतां जिकडे तिकडे आनंदीआनंद झाला आहे, तेव्हां आतां कांहीं तुम्हांला मार मिळणार नाहीं.

**पिलोबाः**—( ओरडून ) या हो या, आमच्या रावसाहेबांच्या वाड्यांत मुलगा मुलगीचं जुळं झाल्यामुळं जिकडेतिकडे आनंदीआनंद झाला आहे, तरी हातांतली कामं टाकून धावत पळत या.

**अंजिऱ्याः**—काय पोपई, पैज हरलीस मग-

**पोपईः**—हो हो हरलें मग, काय आहे तुझा विचार ।'

**पिलोबाः**—हं रावसाहेब, द्या आतां ह्यांचं लग्न लाऊन !

**वसंतरावः**—ठीक आहे, पुन्हां सर्व लोक जमा होण्यापूर्वी तुमच्या लग्नाचा वाङ्निश्चय समारंभ करून घेऊं. या असे पुढं. शास्त्रीबुवा द्या लाऊन यांचं लग्न !

**नवग्रहः**—( अंजिऱ्या व पोपईचा हात एकमेकांच्या हातांत घालून ) शुभ-मंगल-सावधान.

**अंजिऱ्याः**—सुंदर आणि लिला ह्यांच्या जन्मामुळं आजपासून वाड्यांतून लिंगविचाराला कायमची गचांडी मिळाली आहे !

**वसंतरावः**—हे तरुण तरुणीनों तुम्हाला तरुणपणीं मूल न झालं तरी हताश होऊं नका ! अनन्य भावानं त्या जगच्चालक प्रभूचे पाय धरा, म्हणजे निदान म्हातरपणी तरी तुम्हाला पुत्र सौख्य मिळून तुम्ही आमच्या प्रमाणं धन्य व्हाल ! लहान मुलं हीच भावी पिढीचे आधार आहेत, आणि मुलं हीच खरीखुरी दहा लाखांची इस्टेट आहे, म्हणून माझी त्या जगत्चालक प्रभू-जवळ अशी विनंती आहे कीं इथं जमलेल्या प्रत्येक विवाहीत स्त्री पुरुषांना निदान एक तरी जुळं देवो, इथं माझ्या सारखे जे कोणी म्हातारे असतील त्यांनीं माझ्या प्रमाणं त्या बाळकृष्णावर पूर्ण निष्ठा ठेवावी म्हणजे तो त्यांना पुढील वर्षी खात्रीनं एकेक जुळं देईल.

—समाप्त—